






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
राज्य मराठी विकास संस्था
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन








अनुक्रमणिका

संपादक : प्र०ना० परांजपे

संपादन-सल्लागार : अशोक रा० केळकर, कृष्ण श्री० अर्जुनवाडकर, आशा मुंडले, द०भि० कुलकर्णी, मॅक्सीन बर्नसन

संपादन-समिती : प्र०ना० परांजपे (प्रमुख), नीलिमा गुंडी, मृणालिनी शहा, विजय पाध्ये, आनंद काटीकर

लेखन व परीक्षणार्थ पुस्तके पाठविण्याचा पत्ता : प्र०ना० परांजपे, सी-1, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे 411 007. स्थिरभाष : (020) 2569 4617 चलभाष : 94225 09638

प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय पत्रव्यवहार व वर्गणी पाठविण्यासाठी पत्ता : आनंद काटीकर, द्वारा. मृणालिनी शहा, 1, शीतल अपार्टमेंट्स, 46/4, एरंडवणे, पुणे 411 004. चलभाष : 94216 10704

मुद्रण-स्थळ : एम०आर० ॲण्ड कं०, सदाशिव पेठ, पुणे 411 030. दूरभाष : (020) 2447 5939

---

मराठी अभ्यास परिषदेच्या **www.marathiabhyasparishad.com** या संकेतस्थळाचे व्यवस्थापक : **चित्तरंजन भट - 93731 04903 विजय पाध्ये - 98220 31963.**
**marathiabhyasparishad@gmail.com** या ई-पत्त्यावर पत्रव्यवहाराचे स्वागत आहे.

---

(१) वार्षिक वर्गणी भरण्यासाठी **पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर** असे आहे. जानेवारी २०१०पासून वार्षिक वर्गणी - **विद्यार्थ्यांसाठी** ₹ ७५/-, **व्यक्तींसाठी** एका वर्षास ₹ १००/-; पंचवार्षिक वर्गणी ₹ ४५०/-, **संस्थांसाठी** एका वर्षास ₹ १५०/-; पंचवार्षिक वर्गणी ₹ ६५०/-.

(२) मराठी अभ्यास परिषदेचे **आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) वर्गणीशुल्क १ जानेवारी २०११पासून ₹ २०००/-**. आजीव सदस्यांना 'पत्रिकेचा'चा अंक पाठवला जातो.

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना** : वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, किंवा धनादेशाने देता येईल. वर्गणी भरण्याचा सोपा मार्ग म्हणजे महाराष्ट्र बँकेच्या कुठल्याही शाखेत मराठी अभ्यास परिषदेच्या (टिळक मार्ग शाखा, पुणे) **बचत खाते क्र० 20057164260** या खात्यात वर्गणी भरणे व आमच्याकडे पैसे भरल्याचे चलन पाठवणे. चलनावर स्वतःचे नाव, पत्ता लिहिण्यास व चलनाची छायाप्रत स्वतःकडे ठेवण्यास विसरू नये. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये.** धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. **धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास आणि 'ॲट पार' नसल्यास रकमेत ₹ ५०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) **जानेवारी २०१०पासून जाहिरातीसाठी दर :**
पूर्ण पान ₹ ३,०००/-, अर्धे पान ₹ २,०००/-, आवरण-पृष्ठ (क्र० ४ = मलपृष्ठ) ₹ ५,०००/-, विशेष रंगीत पृष्ठ ₹ १०,०००/-

---

**प्रकाशन : त्रैमासिक :** जानेवारी(हिवाळा), एप्रिल(उन्हाळा), जुलै(पावसाळा), ऑक्टोबर(दिवाळी)

**सूचना :** (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही. (२) **या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.**

**या अंकाची किंमत ₹ २५/-**



अनुक्रमणिका

## अनुक्रमणिका

## अभिनंदन

या वर्षीचा मराठी ग्रंथासाठी असलेला साहित्य अकादमी पुरस्कार डॉ० अशोक रा० केळकर यांच्या 'रुजुवात' (लोकवाङ्मय गृह प्रकाशन, मुंबई) या ग्रंथास मिळाला आहे. पुरस्काराचे स्वरूप एक लाख रुपये व प्रमाणपत्र असे आहे. पुरस्कारवितरणाचा कार्यक्रम फेब्रुवारी २०११ मध्ये होईल. डॉ० केळकरांचे मनःपूर्वक अभिनंदन! [या ग्रंथाचे डॉ० सीताराम रायकर यांनी लिहिलेले परीक्षण 'भाषा आणि जीवन'च्या दिवाळी २००९ (वर्ष २७, अंक ४) या अंकात प्रसिद्ध झाले आहे.]

---

## महाबँक भाषाविषयक लेखन पुरस्कार

मराठी अभ्यास परिषदेच्या वतीने व महाराष्ट्र बँकेच्या सहयोगाने मराठीतील सर्वोत्कृष्ट भाषाविषयक लेखनासाठी दिल्या जाणाऱ्या महाबँक पुरस्कारासाठी (२०१० या वर्षासाठी) एल०के० कुलकर्णी यांनी तयार केलेल्या 'भूगोल कोश' या पुस्तकाची (राजहंस प्रकाशन, पुणे) निवड करण्यात आली आहे. (पुरस्कार-वितरणाचा कार्यक्रम जानेवारी २०११ मध्ये होईल.) श्री० एल०के० कुलकर्णी व राजहंस प्रकाशन यांचे अभिनंदन!

या पुरस्कारासाठी डॉ० सोनाली कुलकर्णी, डॉ० कलिका मेहता आणि डॉ० मृणालिनी शहा (निमंत्रक) यांनी परीक्षक म्हणून काम पाहिले.

---

## आदरांजली

डॉ० सुभाष भेंडे अखिल भारतीय साहित्य संमेलनाचे माजी अध्यक्ष, कादंबरीकार, विनोदकार, कीर्ती महाविद्यालयातील निवृत्त अर्थशास्त्र-विभाग प्रमुख आणि विश्वकोशाचे अतिथी संपादक होते. मराठी अभ्यास परिषदेचे ते सभासद होते आणि 'भाषा आणि जीवन'साठीही त्यांनी लेखन केले होते.

ज्ञानेश्वर नाडकर्णी नाट्यसमीक्षक, कलासमीक्षक, इंग्रजी व मराठी ह्या दोन्ही भाषांत लेखन करणारे पत्रकार होते. त्यांचा 'चिद्‌घोष' हा कथासंग्रह त्यांच्या संवेदनाक्षम लेखनाचा प्रत्यय देतो.

'भाषा आणि जीवन'च्या परिवारातर्फे या दोन्ही मान्यवरांना आदरांजली.

---

# सार्वजनिक कार्यक्रमांतील भाषेचा वापर

नीलिमा गुंडी

अलीकडे महाराष्ट्रात तऱ्हेतऱ्हेच्या सांस्कृतिक कार्यक्रमांचे पेव फुटले आहे. सन्माननीय अपवाद वगळता या कार्यक्रमांमध्ये होणाऱ्या भाषेच्या वापराविषयी नाराजी व्यक्त करणे गरजेचे वाटते.

या कार्यक्रमांची सुरुवात बहुधा शारदास्तवनाने होते. सुरुवातीला जर 'या कुन्देन्दुतुषारहारधवला' या संस्कृत श्लोकाचे गायन असेल, तर त्यातील 'या शुभ्रवस्त्रावृता'चे अनेकदा 'या शुभ्रवस्त्रामृता' असे उच्चारण होते. आणि 'जय शारदे वागीश्वरी' हे शांता शेळके यांचे गीत असेल, तर त्याचे उच्चारण बऱ्याचदा 'जय शारदे वागेश्वरी' असे कानी पडते. अशा वेळी श्रोत्यांची सहनशीलता हीच त्यांच्या रसिकतेची कवचकुंडले ठरतात.

जाहीर कार्यक्रमात अनौपचारिक संवाद साधण्याची रीत हल्ली लोकप्रिय होत आहे. मात्र अनौपचारिक कशाला म्हणायचे, हा प्रश्नच आहे. अनौपचारिक संवादात खरे तर भाषाविवेक न गमावलेली सहजता अपेक्षित असते. तशा सहज प्रसन्न भाषेचा वावर हल्ली दुर्मिळ होऊ लागला आहे. भाषेचा नेटका, नेमका वापर करण्यातून सांस्कृतिक श्रीमंती व्यक्त होत असते. मात्र जाहीर कार्यक्रमात प्रत्यक्षात घडते ते असे : प्रत्येक वक्ता आपल्या भाषणापूर्वी व्यासपीठावरील सर्वांची लांबचलांब विशेषणे वापरून नामावली घेण्याची औपचारिक परंपरा अजिबात सोडत नाही. प्रत्येक निमंत्रितामागे श्री०/श्रीमती/प्रा०/डॉ० अशा उपाधी हव्यातच, अशी सर्वसाधारण समजूत दिसते. त्यामुळे कार्यक्रमात अनेकदा काहींना 'डॉक्टरेट' ही पदवी बहाल होत असते. 'पद्मश्री' 'पद्मभूषण' हे किताब उपाधीसारखे वापरायचे नसतात, या संकेताचेही सहज उल्लंघन होत असते.

अनौपचारिक शैलीत पाहुण्यांचा परिचय करून देणारा वक्ता पाहुण्यांशी आपले फोनवरून कधी नि कोणते संभाषण झाले, पाहुण्यांशी आपली पहिली गाठभेट कशी झाली, त्या वेळी त्यांनी आपले आदरातिथ्य कसे केले, अशी साग्रसंगीत ओळख जाहीरपणे करून देतो. मनात येणारा प्रत्येक विचार कसलाही आडपडदा न बाळगता श्रोत्यांना तत्काळ सांगून टाकणे म्हणजे अनौपचारिक बोलणे, अशी काहींची समजूत असते. यामध्ये काही वेळा पाहुण्यांचे महत्त्वाचे कार्यकर्तृत्व सांगायचेच राहून जाते! याउलट औपचारिकपणे ओळख करून देणाऱ्यांचा मार्ग दुसऱ्या टोकाचा असतो. तो म्हणजे पाहुण्यांनी दिलेला 'बायोडेटा' यांत्रिकपणे वाचून दाखवण्याचा! त्यामुळे पाहुण्यांचा जन्म





अनुक्रमणिका

कोठे झाला, त्यांना प्राथमिक शाळेत कोणती बक्षिसे मिळाली... इथपासून आजपर्यंतचे त्यांचे सारेच कर्तृत्व जाहीर केले जाते. अशा वेळी शहाणा पाहुणा संकोचून जातो. या परिचयप्रसंगी पाहुण्यांचे नावच न आठवणे, ते चुकीचे उच्चारले जाणे इत्यादी विविध प्रसंगनिष्ठ विनोद कधी कधी घडत असतातच. व्यासपीठावर उभे राहून बोलताना पूर्वतयारीशिवाय बोलल्यावर ते भाषण आपोआप उत्स्फूर्त आणि सहज ठरते, अशी (गैर) समजूत त्यामागे असते.

या कार्यक्रमांमध्ये सर्वांत अस्वस्थ करणारी गोष्ट म्हणजे त्यातील काही सूत्रसंचालकांनी भाषेचा मुक्तपणे केलेला वापर ही होय. सूत्रसंचालक हे जणू शब्दजीवी पात्र असते. या 'सुसूत्र' पात्राचा व्यासपीठावरील संचार गेली काही वर्षे अनिर्बंधपणे सुरू आहे. पूर्वी संगीताच्या कार्यक्रमांना निवेदक असत. गायकांना कार्यक्रमात मध्येमध्ये विश्रांती मिळावी आणि गीतकार, संगीतकार, इत्यादींची माहिती श्रोत्यांना व्हावी म्हणून निवेदकाने भाष्य करणे योग्य असते. पण आता कोठल्याही कार्यक्रमांना - चर्चासत्रांनाही - सूत्रसंचालक असतोच. एकेकाळी निवेदक व्यासपीठावरील जागा न अडवता कार्यक्रमाची सूत्रे सांभाळण्याचे काम अदबीने करीत असे. आता मात्र सूत्रसंचालक ही सर्वांत मोठी असामी असते. सूत्रसंचालकाचा भूतलावरचा वावर आता त्रिखंड हिंडणाऱ्या नारदाशीच तुलना करण्याजोगा ठरावा! (हल्ली लग्नसमारंभातही सूत्रसंचालक संचार करू लागला आहे!)

सतत बोलत राहणे (तेही लाडिकपणे!) आणि ऊठसूट श्रोत्यांकडून टाळ्यांची मागणी करणे, हे आपले काम असल्याची सूत्रसंचालकाची प्रामाणिक समजूत असते. अशा वेळी वाटते, एखाद्या उत्तम कलाविष्कारानंतर सभागृह क्षणभर अवाक् होते, हीदेखील कार्यक्रमाविषयी अनुकूल प्रतिक्रिया देण्याची प्रगल्भ रीत असू शकते, यावर आता आपला विश्वासच उरला नाही का? सूत्रसंचालकामुळे काव्यवाचनाच्या कार्यक्रमात काही वेळा एकाच वेळी दुहेरी मैफल चालू राहते. एक मैफल असते प्रत्यक्ष उपस्थित असणाऱ्या कवींच्या कवितांची आणि दुसरी असते प्रत्येक कवीनंतर सूत्रसंचालक वाचून दाखवत असलेल्या कवितांची! पूर्वी रविकिरण मंडळाच्या काळी जेव्हा काव्यगायनाच्या जाहीर कार्यक्रमांना मागणी होती, तेव्हा आवाज नसलेल्या गायक कवींची श्रोत्यांनी व्यासपीठावरून सदेह उचलबांगडी केल्याच्या वार्ता वाचायला मिळत. त्यामानाने सूत्रसंचालकांच्या लीलांविषयी आजचा रसिकवर्ग फारच सोशिक व उदार दिसतो आहे!

कार्यक्रमाच्या शेवटी आभार मानण्याचा उपचार असतो. आपण कार्यक्रमपत्रिकेत 'आभारप्रदर्शन' असे म्हणून मुळातच 'प्रदर्शना'ला वाव ठेवलेला असतो. त्यामुळे निरर्थक शब्दांचे बुडबुडे कानी पडतातच! हल्ली बोली भाषेतील एकारान्त शब्दाऐवजी अनुस्वारान्त शब्द वापरण्याची लकब आभारप्रदर्शनातही दिसू लागली आहे. त्यामुळे कधी कधी 'यांचे आभार' याऐवजी 'यांचं आभार' असा शब्दप्रयोग कानी पडतो. [आणि कार्यक्रमाच्या अखेरीस पसायदान असले तर त्यामध्ये 'दुरिताचे तिमिर जावो' (पापकृत्याचा, पापाचा अंधार दूर होवो) याऐवजी हटकून 'दुरितांचे तिमिर जावो' असे ऐकू येते!] अशा वेळी

वाटते, सार्वजनिक कार्यक्रमांमध्ये कसे बोलावे (खरे तर कसे बोलू नये!) हे शिकविणारे अल्प मुदतीचे अभ्यासक्रम चालू करण्याची नितांत गरज आहे. शब्दांचे अवमूल्यन ही सांस्कृतिकदृष्ट्या चिंताजनक बाब असते. त्या बाबीकडे वेळीच गंभीरपणे पाहायला हवे. नाहीतर 'औचित्याची ऐशीतैशी' अशी परिस्थिती सार्वजनिक भाषावापराबाबत सार्वत्रिकच होईल.



3, अन्नपूर्णा, 1259, शुक्रवार पेठ,
सुभाषनगर, पुणे 411 002
स्थिरभाष : (020)2448 6015

## आवाहन

टपालाने पाठविलेल्या अंकांतील काही अंक गहाळ होतात, हा नेहमीचा अनुभव आहे. शक्यतो अंक पुन्हा पाठविला जातो. पण जेव्हा या तक्रारींची संख्या जास्त असते तेव्हा अंक पुन्हा पाठवणेही कठीण होते. पुण्याच्या काही भागांतून - विशेषतः बिबवेवाडी, सिंहगड मार्ग - या भागांतून तक्रारी खूप येतात. यामुळे अंकाची प्रत व टपालखर्च असे दुहेरी नुकसान होते. म्हणून जे सभासद/वर्गणीदार/कुरियर-सेवेचे वर्षाला ₹ ४०/- पाठवतील त्यांना अंक कूरियर-सेवेने पाठविला जाईल. ही व्यवस्था हिवाळा २०११ (जानेवारी २०११) अंकापासून करण्यात येईल. कृपया याची नोंद घ्यावी.

# कोळीण घरवाते खडाइली

ब्रह्मानंद देशपांडे

श्रीचक्रधरांचे वास्तव्य खडकुली (तालुका गंगापूर, जिल्हा औरंगाबाद) येथे होते. येथे गोदावरी आणि शिवना या दोन नद्यांचा संगम आहे. या दोन नद्यांच्या मधला जो खडकाळ भूप्रदेश आहे त्याला खडकुली म्हणतात. नाथसागर धरणामुळे ते आता बेट झाले आहे. येथेच श्रीचक्रधरप्रभूंनी पंथाचे प्रथम आचार्य श्रीनागदेवाचार्य यांना दीक्षा दिली. म्हणून हे स्थान पंथात अतिशय पवित्र - महास्थान - मानले जाते.

श्रीनागदेवाचार्य हे श्रीचक्रधरांना अनुसरू नयेत यासाठी त्यांचे पूर्वाश्रमीचे गुरू रामदेव दादोस वडनेरकर यांनी प्रयत्न केला. ते श्रीचक्रधरप्रभूंना म्हणाले,

''जीः जीः हा नागदेवो गोसावीं आपणयापासिं
राहों नेदावा जीः ........ जीः जीः हा नीका नव्हेः
हा अमेगा धांडाळांचा असे :-हा गोसावियांचे काही
आइकैल : आणि पैऱ्हा जाऊनि भडभडैलः''

यावर श्रीचक्रधरप्रभू म्हणाले,

''तैसें एथ काइ गा असेः मां पैऱ्हा जाऊनि भडभडैलः''

यावर निरूत्तर झालेले दादोस वेगळा मुद्दा काढीत म्हणाले.

''एर गोसावीयांचे यासि काइ चलो हेले असेः''

यावर श्रीचक्रधरप्रभू म्हणाले,

''न चलों कां गाः ......... मां पैऱ्हा जाऊनि एणें
कोळिणी घरवातें खडाइली तरि काइः''

(लीळाचरित्र, उत्तरार्ध, लीळा क्र० १)

येथे 'घरवात खडाईणे' असा शब्द आला आहे. त्याचा अर्थ शेवटी शब्दकोशात खडाइणे = प्रपंच चालविणे, नांदणे असा दिला आहे. तो अगदीच अनुमानाने दिला आहे. तो अचूक नव्हेच. शं०गो० तुळपुळे यांनी खडावणे = घेऊन जाणे, अपहरण करणे असा अर्थ दिला आहे. (लीळाचरित्र, हा उत्तरार्ध भाग १, शब्दकोश, पृ० १८९) हा अगदीच दूरचा वाटतो.

विदर्भ संशोधन मंडळ वार्षिकाचा १९८६चा अंक चाळत असता कुसुम पटोरिया या विदुषींचा 'मृच्छकटिकातील देशी शब्द' हा लेख वाचण्यात आला. त्यांनी 'खडआई' या शब्दाविषयी विवेचन केले आहे. ते असे :

''खडआइं (पृ० ४१२) कंगनासाठी हा शब्द आहे.
माझ्या माहितीप्रमाणे व्रज आदी भाषेत

हाताच्या आभूषणासाठी संभवत: कंगनासाठीच
'खडुआ' शब्दाचा प्रयोग होतो.''

खडआइ, खडुआ हा कंगन, काकण वा बांगडी या अर्थी शब्द आहे. संस्कृतमधील कटक आणि मराठीतील कडे या शब्दांची येथे आठवण होते. कटक हा शब्द रघुनाथ पंडिताच्या 'नळदमयंती स्वयंवर' या काव्यातील

वधूनी माझी हे कनकरूपकाया
कटकमुकुटादिक भूषणें कराया

या श्लोकात भेटतो.

तेव्हा कटक, कडे, खडुआ, खडआइं हे कंगन, बांगडी या अर्थाचे शब्द आहेत हे निष्पन्न होते आणि खडाइणे म्हणजे काकणे घालणे, बांगड्या भरणे असा अर्थ प्राप्त होतो. हा अर्थ हिंदी प्रदेशात सर्रास रूढ आहे. माझे एक मित्र डॉ०चंद्रशेखर गुप्त (भूतपूर्व प्रमुख, प्राचीन भारतीय इतिहास, संस्कृती आणि पुरातत्त्व विभाग, नागपूर) हे आपल्या पत्नीसाठी बांगड्या घेत होते. पत्नीची बहीणही सोबत होती. गुप्तजींनी तिच्यासाठीही बांगड्या घेण्याचा प्रस्ताव मांडला. त्यांची पत्नी आपल्या बहिणीला म्हणाली, 'देख! तेरे जीजाजी तुझे चुडियाँ पहिना रहे है।' तिने फणकाऱ्याने बांगड्या घेण्यास नकार दिला. कुठलाही धार्मिक विधी न करता लग्न करणे या अर्थी बांगड्या भरणे हा विधी होतो. 'कडी पहनाना' म्हणजे लग्न करणे हा भाग 'सगीना' आणि 'पाकिजा' या चित्रपटांतही आला आहे. तेव्हा नागदेवाचार्यांनी 'कोळिणी घरवाते खडाइणे'' म्हणजे तिला बांगड्या भरून पत्नी बनवणे असा अर्थ प्राप्त होतो.

## संदर्भ


१. लीळाचरित्र, सं० वि०भि० कोलते, आवृत्ती तिसरी, विश्वशांती प्रकाशन, औरंगाबाद. १९९७
२. लीळाचरित्र, उत्तरार्ध भाग १ ला, सं० शं०गो० तुळपुळे, सुविचार प्रकाशन, नागपूर. १९६७





8-801, कुणाल रेग्युलस, इलाइट एंपायरमागे बालेवाडी, पुणे 411 045
चलभाष : 099233 90614

# यमलार्जुन

मा०ना० आचार्य

प्राचीन मराठी काव्यांतील श्रीकृष्णाच्या बाललीलांचे वर्णन मूळ संस्कृत ग्रंथातील आधारांसह वाचीत असताना 'यमलार्जुन' या शब्दाविषयी आलेला एक मजेदार अनुभव येथे थोडक्यात देत आहे.

या बाललीलांपैकी एक प्रसंग असा - एकदा यशोदेने खोड्या काढणाऱ्या कृष्णाला उखळाला बांधून ठेवले (उलूखलबंधन). ते उखळ ओढीत ओढीत तो अंगणात गेला. तेथे दोन अर्जुन नावाचे वृक्ष उभे होते. त्यांमधून उखळ ओढीत नेताना ते अडकले, तरी कृष्णाने ते तसेच जोरात ओढले. त्यामुळे ते दोन अर्जुन वृक्ष उन्मळून पडले. (यमलार्जुनोत्पाटन). कृष्णाला उखळाशी बांधले होते ते एका दाव्याने. त्यावरूनच त्याला 'दामोदर' (दाव्याने बांधले आहे उदर ज्याचे) म्हणतात. हा प्रसंग तसा बहुतेकांच्या माहितीचाच आहे.

या प्रसंगाच्या वर्णनासाठी पाहिलेले मूळ संस्कृत ग्रंथ असे -

हरिवंश (सुमारे इ०स० पूर्व पहिले शतक)

(चित्रशाळा प्रत - विष्णुपर्व अ० ७, किंवा भांडारकर प्रत - अ० ५१)

विष्णुपुराण - (सुमारे इ०स० पहिले ते तिसरे शतक)

(पंचम अंश - अ० ६) गीताप्रेस प्रत

श्रीमद्भागवत - (र०स० ६ व्या शतकानंतर) यंदे प्रत.

(स्कंध १० अ० ९ ते ११)

भासाचे 'बालचरित' हे नाटक (विवाद्य काळ इ०स० चौथे शतक)

(यातील तिसऱ्या अंकाच्या आरंभीचा प्रवेशक)

- जे मराठी ग्रंथ पाहिले ते असे -

श्रीचक्रधरनिरूपित श्रीकृष्ण चरित्र व नामदेवांचे अभंग (तेरावे शतक)

तुकारामांचे अभंग (सतरावे शतक)

श्रीधर कवीचा हरिविजय (अठरावे शतक)

(दशम स्कंधावर आधारित अन्य ग्रंथांमध्ये चर्चास्पद भाग नाही.)

मूळ संस्कृत ग्रंथातील महत्त्वाच्या घटना वर नोंदल्याच आहेत. हरिवंश व विष्णुपुराण यांमध्ये या त्रोटक स्वरूपात येतात. भागवतामध्ये त्या घटनांना आणखी एका उपकथेची जोड आहे ती अशी -

त्या उन्मळून पडलेल्या दोन अर्जुनवृक्षांमधून दोन तेजस्वी पुरुष बाहेर पडले, ते दोघे म्हणजे पूर्वी नारदांनी शाप दिलेले नलकूबर व मणिग्रीव या नावांचे कुबेरपुत्र होते. यांना नारदांनी शाप देण्याचे कारण असे - एकदा हे कुबेरपुत्र मद्यप्राशनाने धुंद होऊन स्त्रियांसह वस्त्रहीन अवस्थेत जलक्रीडा करत होते. तेवढ्यात तेथे नारद आले. त्यांना पाहून त्या स्त्रिया लाजल्या व त्यांनी वस्त्रे परिधान केली. ते कुबेरपुत्र मात्र तसेच हसतखिदळत राहिले. आपली अशा प्रकारे केलेली अमर्यादा सहन न झाल्यामुळे नारदांनी त्यांना वृक्ष होण्याचा शाप दिला. परंतु त्याच अवस्थेत ते दीर्घकाळ राहू नयेत म्हणून, 'श्रीकृष्ण तुमचा उद्धार करील', असा उःशापही दिला. तद्नुसार कृष्णाने आता वृक्षयोनीतून त्यांची मुक्तता केली.

भासाच्या 'बालचरित्रातील' या प्रसंगाच्या एका गोपालकृत वर्णनाचा अनुवाद असा - 'त्या कृष्णाने ओढीत नेलेले उखळ यमल व अर्जुन या दोन (वृक्षरूपी) राक्षसांवर फेकले. .... नंतर त्या नंदपुत्राने ते उखळ त्यांच्यामधून ओढले व त्या वृक्षांचे चूर्ण केले. तेव्हा त्या वृक्षांनी राक्षसरूप घेतले व ते मरण पावले.'

- संस्कृत पुराणांमध्ये 'यमलार्जुनौ' असा शब्द आहे. 'यमल' म्हणजे 'जुळे'.

भासाच्या नाटकात हे जुळे वृक्ष 'यमल' व 'अर्जुन' नावांचे दोन राक्षस झाले आहेत. ('यमलार्जुनयोः नाम दानवयोः निक्षिप्तम्।') या परिवर्तनाची चिकित्सा पुढे यथास्थळ करू.

आता मराठी ग्रंथकारांची भेट घेऊ. श्रीचक्रधरनिरूपित 'श्रीकृष्णचरित्र' या महानुभाव, गद्य ग्रंथामध्ये या प्रसंगवर्णनातील महत्त्वाचा भाग असा -

'एक दी महादाइसीं विनविलें' : बाबा श्रीकृष्ण चक्रवर्ति यमलार्जुन कैसे उन्मूलीलेः सर्वज्ञें भणतले : ... धनदाचे पुत्र दोघे यक्ष आपुलिआं स्त्रियांसहितु विवस्त्र होऊनि सरोवरीं जळकेली खेळुत होते : तंवं तेथ नारदु स्नालागीं गेला : सरोवराचीं तीरीं अंजनवृक्षातळीं बैसला : ... (इत्यादी, बाकी तपशील भागवती कथेप्रमाणे) परंतु आणखी एक प्रश्नोत्तर असे– 'महदाइसीं पुसिलें : बाबा : अर्जुनवृक्षु तो कवणु : सर्वज्ञें भणतलें : अर्जुन भणजे अंजनाचा वृक्ष :' (प्रसंग ९)

म्हणजे येथे नारद अंजनवृक्षाखाली बसला आहे. यक्षांना शाप आहे (मुळाप्रमाणेच) अर्जुनवृक्ष होण्याचा. परंतु अर्जुनवृक्ष म्हणजे अंजनवृक्ष अशी येथील नवीन भर आहे. याचीही चिकित्सा यथास्थळ येईलच.

दुसरे नामदेव. त्यांच्या अभंगांमध्ये दोन तीन ठिकाणी या घटनेचा उल्लेख आलेला आहे (त्यांतील फक्त प्रस्तुत असलेलाच भाग पाहू.)

१. कुबेराचे पुत्र मदोन्मत्त झाले । म्हणूनि शापिले नारदानें।।१।।
...... विमलार्जुन वृक्ष व्हाल गोकुळांत । उःशाप वदत कृपाळुवा ।।३।।

...... मोडितसे तेव्हा वृक्ष लक्ष्मीचा पती। दोघे निघताती दिव्य पुरुष ।।५।।

(शासकीय गाथा क्र० ७०)

२. ..... कंसचाणूर मर्दिले । विमलार्जुन उन्मळिले ।।१७।।

(शा०गा०क्र० ४४३)

येथे यमलार्जुनांचे 'विमलार्जुन' झाले आहेत. (असाच उल्लेख अ०क्र० १५ मध्येही आहे.)

तिसरे तुकाराम. त्यांच्या अभंगांमध्येही दोन ठिकाणी या घटनेचा उल्लेख येतो. त्यांतील संबद्ध भाग असा-

१. (यशोदेने गोपींसह श्रीकृष्णाला दाव्याने उखळाला बांधले. नंतर एकमेकींकडे पाहत हसत हसत त्या निघून गेल्या...)

'फांकल्या सकळ उपडूनियां उखळा
मोडी वृक्ष विमलार्जुन दोन्ही।।' (३८८.५) शा०गा०

२. 'बाळपणीं रिठ। रगडिला दाढे । मारियेले गाढे कागबग ।।
गळां बांधऊनि उखळासी दावें । उन्मळी त्या भावें विमळार्जुन।।' (४५१९.७)
शा०गा०

येथे विमलार्जुनाऐवजी 'विमळार्जुन' असा अक्षराचा फरक येतो. बाकी जी नवीन भर आहे, तिचा विचार नंतर करू.

आता श्रीधरस्वामी काय म्हणतात ते पाहू.

त्यांच्या 'हरिविजया'मध्ये नवव्या अध्यायात या प्रसंगाचे वर्णन येते. त्यातील संबद्ध भाग असा-

चंडवृक्ष नंदांगणीं यमलार्जुन नामें दोन्ही।
ते नारदें पूर्वी शापोनी ।
वृक्षजन्मा घातले ।
हे पूर्वी कुबेरपुत्र। नांवें यांची नलकूबर ।
परम उन्मत्त अविचार ।
सारासार कळेना ।। ... (९. ८४-८५)

- येथे कुबेरपुत्रांची नावे नल व कूबर अशी झाली आहेत. मणिग्रीवाचा पत्ताच नाही.

आता काही अनुवादकांची व कोशकर्त्यांची भेट घेऊ. डॉ० मु०श्री० कानडे व श्री० रा०शं० नगरकर यांच्या 'श्रीनामदेव गाथा - शब्दार्थ संदर्भ कोश' (इ०स० २००२) या कोशात नामदेवांच्या शा०गा० मधील उपरोक्त अभंगांचा संदर्भ देऊन, 'विमलार्जुन' या शब्दाचा 'अर्जुन नावाचा वृक्ष' असा अर्थ दिला आहे. (एक मुद्रणदोष - ७० ऐवजी ७१ असा क्रमांक पडला आहे. क्र०१५८ चा उल्लेख राहून गेला आहे. याच संपादकद्वयांनी

नंतर (इ०स० २००५ मध्ये) 'नामदेवांचा सार्थ चिकित्सक गाथा' प्रसिद्ध केला आहे. त्यामध्ये उपरोक्त शा०गा०क्र० ७० हा अभंग क्र० ६२ वर आहे. त्यातील पूर्वोक्त ओळींचा त्यांनी केलेला अर्थ असा आहे

'कुबेराचे दोन पुत्र (नल आणि कुबेर) मदोन्मत्त झाले होते. म्हणून नारदाने त्यांना शाप दिला (की तुम्ही वृक्ष व्हाल.) (१) नारदाने उःशाप देऊन म्हटले, 'तुम्ही दोघे जण गोकुळात अर्जुनवृक्ष व्हाल....' (३) ... कृष्णाने ते दोन्ही वृक्ष मोडून टाकले. त्याबरोबर त्यांतून दोन दिव्य पुरुष (नल व कुबेर) निघाले (५)

आता येथे 'नलकूबर' या एका नावाची (श्रीधराच्या हरिविजयातील उल्लेखाप्रमाणेच) फाळणी होऊन दोन पुत्र जन्मले आहेत. आणखी एक मौज म्हणजे कुबेराचा पुत्र पुन्हा कुबेरच! (असो.)

आता तुकाराम कानडे-नगरकरांच्या 'श्री तुकाराम गाथा-शब्दार्थ संदर्भकोशात' (इ०स० १९९९) उपरोक्त दोन्ही अभंगांचा संदर्भ देऊन 'विमळार्जुन' या शब्दाचा 'पांढऱ्या रंगाचा अर्जुनवृक्ष' असा अर्थ केला आहे. विष्णुबुवा जोगांच्या गाथ्यात (येथे उपरोक्त शा०गा०क्र० ३८८ हा अभंग ३८०९ या क्रमांकावर आहे) 'नल व कुबर' असे दोन वृक्ष झाल्याचा उल्लेख आहे. तर त्यांच्याच गाथ्यात (उपरोक्त शा०गा०क्र० ४५१९ हा अभंग येथे ३८४६ या क्रमांकावर आहे.) 'नारदाने शाप दिल्यामुळे 'विमळ व अर्जुन' या नावांचे दोन वृक्ष... ' असा उल्लेख आहे.

म्हणजे एकदा 'नल व कुबर' (कूबर नव्हे) अशी दोन, तर नंतर 'विमळ व अर्जुन' अशी दोन वृक्षनामे झालेली आहेत.

- खंदारकरांच्या गाथ्यात - (येथे अनुक्रमे क्र० ३७७७ व ३८११) 'विमळ व अर्जुन' ही एके ठिकाणी वृक्षनामे आहेत, तर दुसऱ्या ठिकाणी 'विमलार्जुन' असा उल्लेख करून ते 'कुबेरपुत्र की वृक्ष' हे संदिग्ध ठेवले आहेत. दाते-कर्वे यांच्या 'महाराष्ट्र शब्दकोशात' तुकारामांच्या 'उन्मळी त्या भावें विमळार्जुन' या ओळीचा संदर्भ देऊन 'विमलार्जुन' = एक दैत्य, असा अर्थ दिलेला आहे.

- असे हे अनुवाद व अर्थ पाहिले की, नारदांनी शापलेले ते कुबेरपुत्र खरोखरच किती मद्यधुंद होते, याची खात्री पटते.

- पण 'घोटाळस्य उपरि गोंधळः संवृत्तः' अशा या प्रकारांची आपण थोडी चिकित्सा करू. कदाचित त्यातून काहींचा उलगडाही होईल.

- मूळचे 'यमलार्जुन' विमल (ळा) र्जुन झाले आहेत, यात काहीच आश्चर्य नाही. मात्र 'विमलार्जुनाशी' ध्वनिसाम्य असलेला हरिवंशातील एक उल्लेख पाहू, तो असा आहे -

उन्मळून पडलेले ते दोन अर्जुनवृक्ष पाहून, गोपजनांना फार आश्चर्य वाटले. ते म्हणाले, 'अहो बत न शोभेतां विमूलौ अर्जुनौ उभौ।' (श्लोक क्र० ३०) तेव्हा 'विमूल

अर्जुन' व 'विमलार्जुन' यांतील ध्वनिसाम्य लक्षणीय आहे. अर्थात त्यावरून निष्कर्ष काढण्याची घाई नको.

पण अशा ध्वनिसाम्यामुळेच 'अणोरणीयान्' (अणोः अणीयान्) या औपनिषदिक (श्वेताश्वेतरोपनिषद् ३:२०, गीता ८.९) वर्णनाचे तुकारामांच्या अभंगात 'अणुरणीया थोकडा' असे रूपांतर झालेले सहज आठवते. (तुकाराम - शा०गा०क्र० ९९३)

भागवतामध्ये कुबेरपुत्रांची नावे 'नलकूबर आणि मणिग्रीव' अशी स्पष्टपणे दिलेली आहेत (१०.१०.९४). पण त्याजबरोबर एके ठिकाणी 'नलकूबर' हे एकच नाव लक्षणेने दोन्ही पुत्रांना उद्देशूनही योजले आहे (१०.१०.४२). (मात्र या श्लोकात 'नलकूबर' हे संबोधन एकवचनी व अन्यपदे द्विवचनी असल्यामुळे अन्वय लावण्याचे काम फार दुर्घट झाले आहे.)

- कुबेर (पितृनाम) व नलकूबर (पुत्रनाम) यांतील ध्वनिसाम्य असणाऱ्या घटकांमुळे मराठीतले अन्य घोटाळे संभवलेले दिसतात.

- आता थोडी वृक्षनामांची चर्चा करू. कारण चक्रधरनिरूपित श्रीकृष्णचरित्रात, 'अर्जुन म्हणजे अंजनवृक्ष' असे म्हटले आहे; तर कानडे-नगरकरांनी विमलार्जुन म्हणजे 'पांढऱ्या रंगाचा अर्जुनवृक्ष' असा अर्थ दिला आहे.

वनस्पतिशास्त्रामध्ये 'अर्जुन' व 'अंजन' या दोन्ही वृक्षांची स्वतंत्र माहिती मिळते. अर्जुन म्हणजे 'अर्जुनसादडा' या नावाने ओळखला जाणारा एक उंच वृक्ष. सुमारे २४ मीटरपर्यंत उंच वाढणाऱ्या या वृक्षाची साल जाड, गुळगुळीत, हिरवट पांढरी वा क्वचित लालसर असते. ती औषधी आहे. लाकूड इमारतीसाठी उपयोगी असते. अंजन (अंजनी) याची उंची ३५ मीटरपर्यंत वाढते. याचे लाकूड टणक व टिकाऊ असल्यामुळे रेल्वेच्या रुळांखालील स्लीपर्ससाठी ते वापरतात. अन्यही उपयोग आहेतच. असे हे दोन वृक्ष वनस्पतिशास्त्रदृष्ट्याही वेगवेगळ्या वृक्षकुळातील आहेत. अर्जुनवृक्ष 'कॉम्ब्रेटेसी' या वृक्षकुलातील असून 'अंजनवृक्ष' 'लेग्युमिनोजी' या कुलातील आहे. (मराठी विश्वकोश खंड १, संबद्ध नोंदी)

आता येथे अर्जुनवृक्षाच्या सालीचे जे दोन वेगवेगळे रंग सांगितले आहेत त्यावरून 'पांढऱ्या रंगाचा अर्जुन' वृक्ष असा विमळार्जुनाचा अर्थ केला असावा काय? या अर्थाला उद्बोधक असा एक कोशगत अर्थ देतो. दाते-कर्वे यांच्या महाराष्ट्र शब्दकोशात अर्जुन (वृक्ष) म्हणजे, 'अर्जुनसादडा-साताडा; पांढरा ऐन' याचा पांढरा डिंक औषधी आहे. हे झाड कोकणात होते.... अशी माहिती येते. 'अर्जुन' हे विशेषण 'पांढरा' अशा अर्थीही येते. तेव्हा या माहितीच्या संशयाचा फायदा कोशकर्त्यांना द्यायला हरकत नाही.

पण तरीही एक रुखरुख राहतेच. कानडे-नगरकरांनी नामदेवाच्या सार्थ गाथ्यात 'विमलार्जुन' या शब्दाचा 'यमलार्जुन' हा पाठभेद नोंदला आहेच. मग या दोहोंमधील ध्वनिसाम्य सोडून हे जंगलात कशाला गेले?

---

- अर्जुन व अंजन हे वेगवेगळे वृक्ष. स्वाभाविकच 'अर्जुन भणजे अंजनवृक्ष' ही चक्रोधरोक्त माहिती शास्त्रीय दृष्ट्या प्रामादिक ठरते. कदाचित अंजनवृक्षाचे सापेक्ष वैपुल्य लक्षात घेता हा उल्लेख आलाही असेल. म्हणून तर चक्रधरांनी नारदाला बसविले आहे ते अंजनवृक्षाखालीच.

(या संदर्भात गोविंदाग्रजांच्या श्रीमहाराष्ट्र गीतामधील 'अंजनकांचनकरवंदीच्या काटेरी देशा' ही गौरवपंक्ती आठवावी.)

आणखी एक मुद्दा जसा की, झाडांबदलची शास्त्रीय माहिती वेगळी व लोकसमजूत वेगळी- असाही प्रकार संभवतो.

या लोकसमजुतीमुळे 'यमलार्जुन' हाही एक राक्षस झाला नाही का? त्याच उल्लेखांचा आता परामर्श घेऊ.

भासाच्या बालचरितातील गोपकृत वर्णनात याचे चांगले प्रतिबिंब उमटले आहे. या वृक्षोन्मूलन प्रसंगापूर्वी कृष्णावर अनेक संकटे येऊन गेली होती. (उदा० पूतना, तृणावर्त, गाडा उलटणे.) त्यांतून तो दैवयोगानेच सुटला अशी गोकुळातील सामान्य गोपजनांची श्रद्धा होती. त्यांच्या दृष्टीने ही संकटे म्हणजे राक्षसच होते. म्हणून तर भासाच्या नाटकातील गोप यमलार्जुनांना राक्षस म्हणतो.

याच भूमिकेतून तुकारामांच्या पूर्वोक्त (अ०क्र० ४५१९) या अभंगाकडे वळू या. तेथे 'रिठा रगडिला, कागबग भारले व त्याच 'भावें' विमलार्जुन उन्मळीले' - असा उल्लेख येतो. तुकारामांच्या दृष्टीनेही जसा रिठासुर, कागासुर, बकासुर तसाच हा विमलार्जुनही एक असुरच आहे.

हा रिठासुर कोण? हा नामदेवांच्या अभंगातही भेटतो. (शा०गा०क्र० १७७) भागवती कथेत अरिष्टासुर आहे व तो वृषभरूपाने आलेला आहे. (भागवत १० क्र० ३६). नामदेवांच्या उपरोक्त अभंगातही असेच वर्णन आहे. चक्रधरोक्त श्रीकृष्णचरित्रात रिठासुर (प्रसंग ५) व अरिष्टासुर (प्रसंग १९) हे दोघेही स्वतंत्रपणे आले आहेत. बकासुर भागवती कथेत आहे. (स्कंध १०, अ० ११), कागासुर हा मात्र लोकसमजुतीतला. हा चक्रधरोक्त श्रीकृष्णचरित्रातही भेटतो (प्रसंग ११).

रिठासुर हाही लोककथांतीलच आहे. 'रिठा' हा शब्द सं० अरिष्ट या शब्दावरून आला. खेडेगावात अजूनही या रिठ्याच्या फळांचा उपयोग साबणाऐवजी कपडे धुण्यासाठी करतात. (मनुस्मृतीमध्ये कोणती वस्त्रे कोणत्या फळांनी स्वच्छ करावीत हे सांगताना 'कुतपानां अरिष्टकैः।' असा उल्लेख आला आहे. (मनु० ५.१२०) 'कुतप' म्हणजे लोकरीचे वस्त्र.) या रिठ्याच्या फळांमध्ये कठीण व काळ्या बिया असतात. लहान मुलाला दृष्ट लागू नये म्हणून या बियांची माळ त्याच्या गळ्यात घालतात. कृष्णाच्या गळ्यात अशीच एक माळ घातलेली होती. तीमधील एका बीमध्ये एक असुर दडून बसला होता.

कृष्णाने त्या रिठ्यामधील बी) दाढेखाली रगडली व त्या असुराला ठार मारले. (पाहा - श्रीचक्रधरोक्त श्रीकृष्ण चरित्र-सं० रा०चिं० ढेरे, प्रस्तावना पृ० २६)

अशा या लोकसमजुतींवर आधारित कथा. भागवतात त्यांना आधार नाही, हे सरळच आहे. परंतु ज्याप्रमाणे शास्त्रीय सत्य वेगळे व लोकसत्य वेगळे, त्याचप्रमाणे भक्तीचे परिणत सात्त्विक रूप वेगळे व लोकसंस्कृतीमधील श्रद्धेय रूप वेगळे.

प्राचीन मराठी काव्यातील शब्दांचा विचार करताना, अशी अनेक व्यवधाने सांभाळावी लागतात; एवढाच या उचापतीचा निष्कर्ष.

■

मु० व पोस्ट चौल, ता० अलिबाग
जि० रायगड 402 203
स्थिरभाष : (02141) 240362

### शैली आणि तंत्र

'शैली आणि तंत्र' या पारंपारिक भारतीय साहित्यविचारातल्या संज्ञा नाहीत. त्या अनुक्रमे 'स्टाईल' आणि 'टेक्नीक' या इंग्लिश संज्ञांना पर्याय म्हणून मराठीत स्थिर झाल्या आहेत..... संस्कृतमध्ये 'शील' म्हणजे अनुशासनयुक्त संस्कारित अवस्था. माझ्या समजुतीप्रमाणे जनार्दन सखाराम गाडगीळ यांनी 'शैली' हा शब्द मराठीत प्रथम (कदाचित भारतीय भाषांत प्रथम) 'स्टाईल' या शब्दाला पर्याय म्हणून वापरला. (''लिहिण्याची शैली'' मराठी ज्ञानप्रसारक, एप्रिल,मे १८६३) ज्यामुळे कर्त्याचे शील प्रकट होते ती 'शैली' असा काही विचार 'शैली' शब्दाची निवड करण्यामागे असावा. साहित्यचर्चेत 'टेक्नीक' शब्द (आणि त्यामुळे 'तंत्र' शब्दही) बऱ्याच उशिरा शिरला. त्यापूर्वी 'क्राफ्ट' ह्या शब्दावर भागत असे. (मराठीतही 'कुसर' किंवा 'कारागिरी' हे शब्द वापरतात.) मराठी साहित्य चर्चेत 'तंत्र' शब्द प्रथम कुणी वापरला आणि 'मंत्र' शब्दाशी त्याची सांगड कुणी घातली याचाही शोध घ्यायला पाहिजे. (संस्कृतमध्ये तांत्रिक विद्येच्या संबंधात मंत्र, तंत्र, यंत्र असे एक त्रिक आहे; सुदैवाने मराठी साहित्य चर्चेत कुणी 'यंत्र' शब्द आणलेला नाही!) 'टेक्नीक' या शब्दाचा सर्वसाधारण अर्थ 'विशिष्ट काम साधण्याची विशिष्ट पद्धत' ... 'स्टाईल' आणि 'टेक्नीक' हे शब्द इंग्लिशमध्ये साहित्याखेरीज इतर ललित कलांच्या संबंधातही वापरतात. ('शैली' आणि 'तंत्र' शब्दांच्या बाबतीत मराठीतही आता थोड्या उशिरा तेच घडते आहे.)

- डॉ० अशोक रा० केळकर, 'रुजुवात' पृ० ५०

# मराठी कविता : प्रमाणभाषेकडून बोलीभाषेकडे

हेमंत गोविंद जोगळेकर

एका भाषिक प्रदेशातील बोलीभाषा स्थलानुसार बदलत असली तरी लिखित भाषा मात्र बव्हंशी एकच प्रमाणभाषा असते. कवितेची भाषा लिखित गद्य भाषेपेक्षा वेगळी राहिलेली आहे. तिला केवळ सांगायचे नसते. ते सांगणे प्रतीतही करायचे असते. त्यासाठी ती प्रमाणभाषेकडून बोलीभाषेकडे वळत असते. काव्य संस्कृताधिष्ठित असताना केशवसुतांची कविता साध्या मराठीतून आली. त्यासाठी त्यांना त्या काळी शब्ददरिद्रीही म्हणवून घ्यावे लागले. त्यांचा नवा शिपाई

जिकडे जावे तिकडे माझी भावंडे आहेत
सर्वत्र खुणा माझ्या मजला घरच्या दिसताहेत

असे साध्यासुध्या मराठीतून सांगतो. पण या खुणा पटवताना तो म्हणतो,

कोठेही जा पायाखाली तृणावृता भू दिसते
कोठेही जा डोईवरती दिसते नीलांबर ते

आपल्याला जे जाणवते आहे ते मात्र साधेसुधे नाही. त्याचे असामान्यत्व दाखविण्यासाठीच की काय, केशवसुतांना 'तृणावृता भू' 'नीलांबर' असे संस्कृत शब्द वापरावेसे वाटले असावेत.

पुढे बोलीभाषेतूनही मराठी कविता येऊ लागल्या. रविकिरण मंडळातल्या किरणांनी ग्रामीण भाषेत कविता लिहिल्या, पण त्यांतली मानसिकता नागर वाटत राहिली. आता गावाकडच्या निवेदकाच्या भावभावना आणि प्रगल्भ जाणिवा व्यक्त करण्यासाठी ग्रामीण भाषा समर्थ आणि समर्पक असल्याची प्रचीती अनेक कवींनी आणून दिली आहे. ग्रामीण भाषेत लिहिलेल्या बऱ्याच कविता, अभंग, ओवी, लोकगीतांच्या छंदातून आल्या. आजही येत आहेत. पण कवितेतली गावकडची - शेतकऱ्याची भाषा कालानुसार हैब्रीड झाली आहे.

**हैब्रीड**

वाणीकिणीचा पाऊस
असा आला तसा गेला
शिवाराचा बांधेसूद
देह निम्माअर्धा ओला.
सोन्याहून महागले
हैब्रीडाचे बी बियाणे
गेले साल घटावले

गावरान पेरल्याने.
अशा निर्वाणीच्या वेळी
जरी हैब्रीड पेरले
पुढे पावसाचे कोणी
शब्दचित्र रेखाटले?
आज तरी पावसाचा
नाही मागमूस कोठे
हैब्रीडाच्या बियाण्याला
गावरान रडू फुटे.

शशिकांत शिंदे यांच्या या कवितेत 'वाणीकिणी'सारख्या गावरान शब्दाबरोबर 'हैब्रीड'सारखा हैब्रीड शब्द सहज आणि सार्थ होऊन येतो. पण अनेक छंदोबद्ध ग्रामीण कवितांची भाषा आणि भाव तसाच रोमँटिक राहिलेला आहे. शंकर सखारामांच्या कवितेत भेटणारी 'एकटी पोर' एकटी नाही. अनेक कवींच्या अनेक कवितांतून तसाच 'झिनझिनाट' उठवणाऱ्या पोरी भेटतात.

गावाच्या पांदीत
झाडांच्या सांदीत
भेटलीस पोरी
एकटी गऽऽ

शेवटच फक्त थोडा वेगळा आहे

घातली सरी
दादल्या घरी
गेलीस पोरी
एकटी गऽऽ

हेच शंकर सखाराम मुक्तछंदातही समर्थ कविता लिहितात. समर्थ आणि वेगळीही.

तुझ्या-माझ्या खुणेचा डोंगर
तुझा रोज निरोप सांगतो
तुझ्या पुसू गेल्या कुंकवासाठी
मला गळ घालतो.
डोंगर नि मी
हवा खात बसतो
मुकाट मनात
काळोखात बुडतो.



अनुक्रमणिका

रातच्याला आभाळ ठिबकू लागते
डोंगर हरवलेला असतो
झाडे तू झालेली असतात.

केशव सखाराम देशमुखांच्या कवितेत भाषा चरित्रक्रमानुसार नागर होताना दिसते.

**भाकरीचा अभ्यासक्रम**

मिरोग पोटभर बरसून गेला म्हणजे
संपूर्ण शिवारात औतांची यात्रा भरून.
दिसे
कुणब्याची खरी आषाढी
औतांच्या दांडीत आणि नांगरांच्या
फाळात
असल्याचा प्रत्यय औतं पाहिले की होई.
त्याआधी
शेतभर औतपाळी चाले
वखरावर दगड बांधून
वखर भूमीत नीट घुसावा म्हणून
बाप औत जोमानं हाणी
पाळी करण्यासाठी
मी वखरावर बसे
बैल झपझप चालून
रान विंचरून काढीत
माझ्या,
बैलांच्या,
बापाच्या
अशा तिहेरी जीवांच्या दैना
आज आठवल्या की झोप कडू होते.
भाकर गोड लागत नाही.
बळ
देणारे
ते
दिवस
आज आयुष्याचाच च्यवनप्राश झाले आहेत.

तेव्हाच्या 'मिरोगा'ने सुरू होणारी कविता निवेदकाच्या आजच्या नागरभाषेत सहज शिरते.





अनुक्रमणिका

देशावरच्या ग्रामीण भाषेव्यतिरिक्त मराठीच्या इतरही बोलीभाषांतून कविता अवतरल्या आहेत. विठ्ठल वाघ वऱ्हाडी बोलीत लिहितात. महेश केळुसकरांचा झिनझिनाट मालवणीतून प्रत्ययाला येतो. बाहरू सोनवणे आदिवासी मुलाच्या सूक्ष्म जाणिवा अहिराणी भाषेतून व्यक्त करतात. पण मराठी वाचकांसाठी तिचा मराठी तर्जुमा द्यावा लागतो. निवेदकाची अस्सल भाषा म्हणून बंबैय्या हिंदीतून आपली मराठी कविता लिहायला आजचे कवी कचरत नाहीत आणि आपणही या कविता वाचायला! वर्जेश सोलंकींच्या 'शब्बाखैर' कवितेची निवेदिका बारबाला आहे. ही कविता संपूर्णपणे बंबैय्या हिंदीतून आहे. इंग्रजी ही आज ज्ञानभाषा आणि संपर्कभाषाही झालेली आहे. अनेक इंग्रजी शब्द मराठी कवितेत अगदी घरच्यासारखे वावरतात. सलील वाघांच्या 'चॅट'सारख्या कवितेत रोमन लिपीतून चॅट केलेले आहे. त्यांच्या 'भूर्जपत्र'सारख्या कवितेत संस्कृत, इंग्रजीबरोबर कानडीही येते, तेव्हा आपण हसण्याखेरीज काहीच करू शकत नाही!

मात्रा कुण्डलिनी ज्ञेया ध्यानमस्य प्रवक्षते ।।
(नारदस्मृती ५६ पं०ग०हे०-भा०लि०मौ०ए०)
चॅरिटेबल ट्रस्टच्या तोऱ्यात फणकाऱ्याने सांगायचे
झाल्यास; औदु निर्दिष्ट अक्षरवन्नु वैयक्तिक अभिरुचिगे
तक्कन्ते अळवडिसिकोंडु मूलत:बदलावणेगळन्नु
माडदे बरेयबहुदु बल्लेबल्ले

नागर बोलीभाषाही कवींना वापरावीशी वाटते. तथाकथित काव्यात्म शब्दांऐवजी साधे बोलण्यातले शब्द असलेली बोलगाणी पाडगावकर लिहितात. आपण लिहिताना व्याकरणशुद्ध भाषा लिहितो. पण बोलताना ती उच्चारसुलभ करून बोलतो. अशा भाषेचा वापर नितिन कुलकर्णी आपल्या कवितांतून खुबीने करतात. त्यांची ही **'केसाच्या अंतरावर'** :

केसाच्या अंतरावर कटिंगवाला
पावलाच्या अंतरावर चप्पलवाला
पिशवीच्या अंतरावर भाजीवाला
अंडीलोणीदूधगिर्णी अगदी लागुन लागुन
शाळाकॉलेजं ऑफिसंफिफिसं अगदी लागुन लागुन

पूर्व-घराचा प्रवेश, ईशान्य-देवघर
उत्तरेकडे उत्तमांग करून कधीच झोपत नाए
उघड्या दारातून उभी चूल कधीच दिसत नाए
दक्षिण भिंतीवरती एक छिद्रसुद्धा ठेवलेलं नाए
म्हणजे आता, सगळं कसं अगदी सेफैनाए?

उच्चारानुसारी भाषेतून लिहिताना येथे नितिन कुलकर्णी आजच्या शहरवासियांची जीवनदृष्टीही व्यक्त करतात. उच्चारानुसारी भाषा ते इतकी ताणतात की आपल्याला हसू येते. पण आपण या भाषेला हसताना या जीवनदृष्टीलाही नकळत हसतो. या जीवनदृष्टीवर कोणतेही भाष्य न करता केवळ या भाषेच्या वापरातून कवी या जीवनदृष्टीची योग्यायोग्यता प्रश्नांकित करतो.

प्रमाणभाषेत नसलेले व्याकरण-अशुद्ध वाक्प्रयोगही काही कवी वापरत असतात. हे वाक्प्रयोग त्या कवितेच्या निवेदकाच्या व्यक्तिमत्त्वाचे रंगच स्पष्ट करीत असतात. मंगेश नारायण काळे यांच्या निवेदकाचे हे दृष्टान्त.

नि माणूस हा बिनशेपटीचा वानरच आहे
हे तर लिहिल्याच गेलेलं नाहीये अजून
फार्फार वर्षापूर्वी शेपूट गळून पडल्यावरही

भाषेशी खेळण्याचा आणखी एक प्रकार आहे जुने शब्द मोडण्याचा, त्यातून नवे घडवण्याचा आणि त्यायोगे वेगळेच काही सुचवण्याचा. मर्ढेकर, पु०शि० रेगे, अरुण कोलटकर अशा अनेक मातब्बर कवींनी तो खेळलेला आहे. मर्ढेकरांच्या कवितेत अरुणोदयाऐवजी गिरिणोदय होतो. पु०शि० रेग्यांनी जे 'पाहिले न पाहिले' ते झनन-झांजरे, ठिवक-ठाकडे, बहर-बावरे असते. अरुण कोलटकरांच्या बेहद्द नाममात्र घोड्याची दौड 'खोडदौड' असते. नितिन कुलकर्णी, सलील वाघ यांच्यासारखे अलीकडचे कवी हा खेळ अधिक मिष्किलपणे खेळतात. नितीन कुलकर्णींच्या या **'टिव्हीसांजेच्या कविता'** :

टिव्हीतल्या टिव्हीतल्या टिव्हीतुन
टिव्हीतल्या टिव्हीत हरवणे
टिव्हीतल्या टिव्हीत हसणे

दुभंग की तिभंग
आईची कटकट
टिव्हीत लपून टिव्हीत सापडणे

डोकं स्तब्ध तिरकी मान तोंड उघडं
सताड टिव्हेलागण
रिमोटपणे निमूट दाबणे
मनातल्या मनात विस्फारणे

खोलीतल्या अंधारात/टिव्हीच्या उजेडात पसारा
गादी उशी पांघरूण/माझा शहारा

टैवाहिक जीवन/सुखात आणि समाधानात





अनुक्रमणिका

टीव्हीने आपले जीवन व्यापून टाकलेले आहे. ते दाखवायला नितिन कुलकर्णी टीव्ही या शब्दापासून नवे अर्थ नव्या जाणिवा सुचविणारे शब्द घडवतात. टिव्हीसांज म्हटले की आपल्याला तिन्ही सांजा आठवतात, आणि तिन्ही सांजांशी निगडित असलेली हुरहूर टिव्हीसांजेत हरपल्याची जाणीव होते. आता दिवेलागणीऐवजी टिव्हेलागण होते आणि वैवाहिक सुखाची जागा टैवाहिक सुख बळकावते! नादसाधर्म्य असलेले असे शब्द कवितेत आणखी काही सुचवतात. सलील वाघांची ही **'बैठकीची लावणी'** :

अवं राया/लॉगीन करताय न्हवं...

लॉगीनचे 'लगीन'शी असलेले साधर्म्य वाचकांना गुदगुल्या करते. तिने इंटरनेटवर कनेक्ट होण्यासाठी दिलेल्या ह्या निमंत्रणात शृंगार गर्भित आहे. पण हा शृंगार (दूर) बसून करायचा आहे, म्हणून ही 'बैठकीची' लावणी!

'लॉग इन' हा इंग्रजी शब्द संगणक-इंटरनेटच्या वापरामुळे मराठीत रुळला आहे. एसेमेसची, संगणकाची, मॉल संस्कृतीची, इंग्रजी शब्दांनी भरलेली एक नवीच भाषा आज मराठी कवितेत मोठ्या प्रमाणात वापरली जात आहे. अशा कवितांची एक लाटच किंवा लाटाच येऊन राहिल्या आहेत.

**उद्‌धृत कविता / कवितांश**


१) नवा शिपाई - केशवसुत

२) हैब्रीड - शशिकांत शिंदे, शरणागताचे स्तोत्र

३) गावच्या पांदीत ... वादळ वाऱ्यात - शंकर सखाराम, झाडातल्या कविता

४) तुझ्या माझ्या खुणेचा डोंगर.... शंकर सखाराम, झाडातल्या कविता

५) भाकरीचा अभ्यासक्रम - केशव सखाराम देशमुख, अनवाणी चालणारे पाय

६) मात्रा कुण्डलिनी - भूर्जपत्र, सलील वाघ, रेसकोर्स आणि इतर कविता

७) केसाच्या अंतरावर - नितिन कुलकर्णी, सगळं कसं अगदी सेफैनाए

८) माणूस हा शब्द कसाही लिहिता येतो - मंगेश नारायण काळे, नाळ तुटल्या पुरुषाचे दृष्टान्त

९) टिव्हीसांजेच्या कविता - नितिन कुलकर्णी

१०) बैठकीची लावणी - सलील वाघ, रेसकोर्स आणि इतर कविता


■


हेमलता, 917/19 सी, फर्गसन कॉलेज रस्ता, पुणे 411 004

स्थिरभाष : (020) 2565 5321

चलभाष : 094235 82565

ई-पत्ता : hemantjoglekar@yahoo.co.in

# खानदेशातील गुर्जर बोली : काही निरीक्षणे

फुला बागुल

महाराष्ट्रातल्या खानदेशात धुळे, जळगाव, नंदुरबार या जिल्ह्यांत बोलल्या जाणाऱ्या विविध बोलींपैकी 'गुर्जर' ही एक जातनिदर्शक बोली आहे. गुर्जर ही एक शेती करणारी अत्यंत कष्टकरी, अल्पसंख्य जमात (लोकसंख्या साधारण चाळीस हजार) असून सात्त्विक प्रवृत्तीचीही आहे. कृष्णभक्तीची परंपरा या जातीत असून काही बांधव महानुभाव पंथीय तर काही बांधव स्वाध्याय संप्रदायातील आहेत. रेवा (लेवा) गुजर, दोरे गुजर, डाले गुजर, कडवा गुजर, गरी गुजर, बडगुजर, खापरागुजर या त्यांच्यातील पोटजाती आहेत. पंजाब, राजस्थान, गुजरात येथून गुर्जर अकराव्या शतकात खानदेशात स्थलांतरित झाले. विविध अभ्यासकांनी या संदर्भात पुढील अभिप्राय नोंदविले आहेत.

१) ''लेवा गुजर स्वत:ला लठू राजा व त्याचे पुत्र अमसिंगत, जमादीगंत, मेहरीगंत आणि सुरादिगंत यांचे वंशज मानतात. आपण रणथंबोर (राजस्थान) येथून आल्याचे ते सांगतात. रणथंबोर येथून त्यांना राजपूत टोळ्यांनी जुनागडला हाकलून लावले. जुनागडहून ते अहमदाबादला आल्यावर त्यांच्या पाच पिढ्या तेथे नांदल्या. तेथूनही त्यांना पावागड व चंपानेर भागात हुसकावून लावण्यात आले. तेथे त्यांनी छत्तीस उपनगरांचे शहर बसविले. या बालेकिल्ल्यातूनही छप्पी राजाने त्यांना स्थानभ्रष्ट केल्यामुळे ते नर्मदेच्या खोऱ्यातील निलगड भागात विखुरले. तेथून ते नेमाडच्या पूर्वेस आले आणि करगुंदच्या भोवताली ३२ ठिकाणी वस्ती करून राहू लागले. कालांतराने करगुंद येथून २००० बैलगाड्यांच्या तांड्याने निघून त्यांनी खानदेशात प्रवेश केला. त्यांतील काही थाळनेर डोंगराच्या अलीकडे व काही असीरगड जवळील तापीच्या खोऱ्यात आले. हे स्थलांतर अकराव्या शतकातील असावे. दोरे गुजर उत्तरेकडील दर्बगड (राजस्थान) येथून अबू येथे आले. तेथून भरुच जिल्ह्यातील अंकलेश्वरला व तेथून मंडागड आणि बडोद्याच्या दाभोई किल्ल्याला आले. तेथून पावागडकडे व मुसलमानांनी पावागड जिंकून घेतल्यावर ते तोरणमाळ डोंगररांगेत आले. तोरणमाळहून सहा गट पडून एक सुलतानपूर, दुसरा कोथळी, तिसरा धानूर, चवथा शिरपूर, पाचवा शहादा व सहावा मुस्तफाबाद (चोपडा) येथे आला.'' (देसाई, २००६, ४०-४१)

२) ''गुजर या जातीच्या नावाच्या उत्पत्तीबद्दल विद्वानात फार मतभेद आहेत. कनिंगहॅम, क्यांबेल, स्मिथ हे पाश्चात्त्य त्यांना परकीय बाह्य, युएची, शक, गूर्ग, खजर, जुजू किंवा गोरे हूण म्हणतात व आपल्या इकडील चिंतामणराव वैद्यादी विद्वान त्यांना मूळचे आर्यच म्हणतात. गुजर म्हणजे गाई राखणारा (गोचिर किंवा गौचारण) अगर गाई चोरणारा (गोचार) अशीही या नावाची व्युत्पत्ती राजकीय इतिहासकार देतात. हे परकीय

बाह्य लोक ख्रि०श०च्या पहिल्या पाच शतकात इकडे आले असावेत असे वरील तर्कवाद्यांचे म्हणणे आहे.''

खानदेशातही हे लोक आहेत. त्यांना तिकडे कुणबी अगर मराठी यांच्याप्रमाणे मानतात. तेथे हे लोक बागाईत करून भाजीपाला विकतात. त्यामुळे कदाचित भाजीबाजारास गुजरी हे नाव मिळाले असावे. हे व्यापारीही आहेत. गुजरातेत गुर्जर ब्राह्मणही आहेत. हे पूर्वी कोठले रहिवासी होते, याच्याबद्दलही वाद आहेत. पाश्चात्त्यांच्या मते बाह्य हूणांनी (गुजरांनी) हे आपले उपाध्याय आपल्याच बरोबर आणले. हल्ली हे श्रावक व इतर गुजरांचे उपाध्याय व देवळांतील पुजारी म्हणून आहेत. बुंदी, अलवारकडील रजपूत ब्राह्मण, मारवाडकडील गौड ब्राह्मण व मेर ब्राह्मण यांचा या गुर्जर ब्राह्मणांशी थोडाफार संबंध येतो. तसेच पुष्कर ब्राह्मण व गुजरातेतील नागर ब्राह्मण यांचाही या गुजर ब्राह्मणांशी संबंध आहे. नागर हे बुद्धिवान व देखणे असून, गुजरातच्या राज्यकारभारात ते गेल्या हजार वर्षांत प्रसिद्धीस आले आहेत. गुजर लोक फार धर्मभोळे असून त्यांना चारण किंवा भाट यांचा फार धाक असतो व त्यांच्याविषयी पूज्यबुद्धीही असते.'' (केतकर, १९२५; १३१-१३२) अशा रीतीने गुर्जरांचे स्थलांतर झाले.

यांतील दोरे गुजर हे प्रामुख्याने जळगाव जिल्ह्यात आढळतात. जवळजवळ सर्व पोटजाती या तापी किनाऱ्यालगत काळ्या व सुपीक जमिनीवर वसती करीत आहेत.

नंदुरबार व धुळे जिल्ह्यातील गुर्जरांची बोली ही गुजराती व अहिराणी यांच्याशी साधर्म्य असणारी आहे. काही प्रमाणात तिचे साम्य राजस्थानी भाषेशीही आहे. मध्ययुगात सत्ताकारणाने कराव्या लागलेल्या पंजाब-राजस्थान-गुजरात-खानदेश अशा स्थलांतरामुळे गुर्जरांच्या बोलीवर गुजराती व राजस्थानी या भाषांचा प्रभाव दिसून येतो. खानदेशातल्या प्रमुख बोलीचा म्हणजेच अहिराणीचा दाट संपर्क असल्याने अहिराणीचाही प्रभाव खानदेशातल्या गुर्जर बोलीवर पडला आहे.

प्रस्तुत निबंधात नंदुरबार, धुळे जिल्ह्यातील गुर्जर बोलींच्या काही वैशिष्ट्यांची चर्चा करावयाची आहे. नंदुरबार जिल्ह्यातील शहादा, नवापूर, तळोदा, नंदुरबार हे तालुके तर धुळे जिल्ह्यातील शिरपूर व शिंदखेडा या तालुका परिसरात बोलल्या जाणाऱ्या गुर्जर बोलीची रूपे अभ्यासार्थ घेतली आहेत.

१) गुजराती भाषेशी गुर्जर बोलीचे निकटत्व आहे. डॉ० दिलीप पटेल यांनी आपल्या 'गुर्जरी लोकसाहित्य' या ग्रंथात विविध उदाहरणे देऊन या प्रभावाची चर्चा केली आहे.

'हामना', (आता) 'आजे', (आज) 'काले', (उद्या) 'गई काले', (काल) 'आवती काले', (परवा) 'नाड्या', (दोरा) 'चाडु', (तोंड) 'मोशालु', (वधूच्या मामाकडचा आहेर) 'भंडामणु', (नाव ठेवण्याजोगे) 'मेंगरा' (भाकरी) 'ओबा' (अरे, बापरे!) हे गुजराती शब्द जसेच्या तसे गुर्जर बोलीत प्रचलित आहेत. (पटेल १९९९; ४०)

शब्दांखेरीज वाक्यविन्यासातही हे साम्य आढळते. गुर्जर बोलीचे पुन्हा प्रांतपरत्वे पोटभेद आहेत. त्यातील पेलाडी प्रांतात बोलले जाणारे - ''तूने शहादा जवु पडशे'' हे वाक्य गुजरातीत - ''तमने शहादा जवु पडशे'' (तुला शहादाला जावे लागले) असे होते. द्वितीयपुरुषी नामात होणाऱ्या बदलाखेरीज अन्य बदल येथे दिसत नाही.

''का हो भाई तमे केवा गामना?'' हे पेलाडी प्रांतातील गुर्जर बोलीतील वाक्य गुजरातीत - ''भाई तमे क्या गामना?'' (भाऊ, तुम्ही कोणत्या गावचे?) असे उच्चारले जाते. संबोधन आणि प्रश्नार्थक सर्वनाम वगळता इतर शब्द जसेच्या तसे उच्चारले गेले आहेत.

''एक राणी व्हती.'' हे गुर्जर बोलीचे वाक्य गुजरातीत - ''एक राणी हती'' (एक राणी होती) असे होते. क्रियापदरूपातील बदल वगळता इतर शब्द समान आहेत.

गुर्जर-गुजराती भाषा निकटत्व अशा प्रकारच्या अनेक वाक्यांच्या उदाहरणांवरून दाखवता येईल.

२) हिंदी भाषिक प्रांतातील राजपुताना, मालवा, उज्जैन इ० ठिकाणी गुर्जर राजांनी आपली सत्ता स्थापन केली होती. यामुळे हिंदी भाषेचाही प्रभाव या बोलीवर पडला आहे.

धुळे, नंदुरबार प्रांतात बोलल्या जाणाऱ्या गुर्जर बोलीवरील हा प्रभाव पुढीलप्रमाणे दर्शविता येतो :

| गुर्जरी | हिंदी | गुर्जरी | हिंदी |
|---|---|---|---|
| रुशी (ऋषी) | रिशी | बिगडु (बिघडणे) | बिगडना |
| शहेर (शहर) | शहर | बठ्यो (बसला) | बैठा |
| तमे (तुम्ही) | तुम | वऊ (सून) | बहू |
| वात (गोष्ट) | बात | घबराववुं (घाबरवणे) | घबराना |

(पटेल, १९९९ : ३६, ३७)

हिंदीत 'ऋ' चा उच्चार 'री' असा तर गुर्जर बोलीत 'रु' असा होतो. अंत्य अवयव उकारांत उच्चारायची सवय गुर्जर बोलीत दिसते.

उदा० बिगडु, (बिघडणे) रखडु, (रखडणे) लिखनु (लिहिणे)

हिंदीतील 'शहर' गुर्जर बोलीत 'शहरे' असे उच्चारले जाते. येथे उपान्त्य अवयव एकारान्त होतो. 'ब' या वर्णाऐवजी 'व' हा वर्ण (उदा० बात - वात) योजण्याची गुर्जरांची भाषिक सवय येथे दिसते.

३) खानदेशातील धुळे, जळगाव, नंदुरबार या तीनही जिल्ह्यांत अहिराणी ही प्रमुख बोली बोलली जाते. खानदेशातल्या गुर्जरांचा विविध कारणांनी दैनंदिन संपर्क अहिराणी बोलीभाषकांशी येतो. यातून अहिराणीचा प्रभाव गुर्जर बोलीवर पडला आहे.

टोमं (वेताची मोठी टोपली), वांगा (वांगे), मक्की (मकई), पयकाठ्या (कापसाची काडी), सरा (पीक काढल्याची नंतरची वेचणी), खेत (शेत), मिरच्या (मिरची), माडी

(आई), माटी (माती), वराडी (वऱ्हाड), देर (दीर), जेठ (नवऱ्याचा मोठा भाऊ), चीडी (चिमणी), डांगर (टरबूज), हजामत (डोई करणे), परतन (शेती मोजण्याचे एकक), खंगाळ (धुणे), नयडं (गळा), रंगत (रक्त), हाड्या (कावळा), हेला (रेडा), शिंगडा (शिंग), धांड्या (तरुण बैल), वऊ (सून), धयडा (म्हातारा), यांसारखे कितीतरी शब्द अहिराणीकडून गुर्जरांनी स्वीकारले आहेत. विशेषत: कृषिजीवनाशी संबंधित नांगर, वख्खर, दुसेर यांसारखे अहिराणीतील शब्द गुर्जरांनी स्वीकारले आहेत. तसेच गुर्जर बोलीतील डिकरा (पुतण्या), उपादी (ब्याद) यांसारखे शब्द अहिराणीने स्वीकारले आहेत.

४) गुर्जर बोलीवर गुजरातीचा प्रभाव असल्याने त्यांच्या बोलीत 'ऑ', 'ॲ' हे (इंग्रजीकडून घेतलेले) स्वर आढळत नाहीत. 'ऑ' ऐवजी 'ओ' आणि 'ॲ' ऐवजी 'ए' अशी स्वरांची उच्चारण रूपे ते योजतात.

उदा० ऑफिस - ओफिस
मॅडम - मेडम
बँक - बेंक
बॉलर - बोलर

गुजराथी भाषेतही 'ऑ', 'ॲ' हे स्वर नाहीत.

५) गुर्जर बोली भाषक 'च', 'ज' या तालव्य आणि दंतमूलीय अशा दोन्ही प्रकारे उच्चारल्या जाणाऱ्या ध्वनींचे केवळ तालव्य उच्चारण करतात. दंतमूलीय 'ज' व 'च' चे उच्चारण त्यांच्यात आढळत नाहीत.

| उदा० | मराठी | गुर्जर |
|---|---|---|
| | जात (ज - दंतमूलीय) | जात (ज-तालव्य) |
| | चुगली (च-दंतमूलीय) | चुगली (च-तालव्य) |

६) गुर्जर बोलीत अंत्य अवयव ओकारान्त उच्चारले जातात.

उदा० नवरो (नवरा), धयडो (म्हातारा), दादरो (जिना), खराटो (खराटा), खाटलो (बाज).

७) धुळे, नंदुरबार जिल्ह्यातील गुर्जर बोलीचे प्रांतनिहाय पुन्हा पोटप्रकार पडतात. डॉ० दिलीप पटेल यांनी 'तापी थडी', 'गोमती थडी', 'भरवाडी', 'पेलाडी' अशा चार प्रकारांत या बोलीचे वर्गीकरण केले आहे. या वर्गीकरणाचा आधार स्पष्ट करताना ते लिहितात - ''इस प्रकार गुर्जरी बोली के तापी थडी, गोमती थडी, भरवाडी तथा पेलाडी चार भाषायी भेद स्पष्ट है। गुर्जरी बोली के भाषायी भेद स्पष्टत: देखने के लिए शब्दावली की विभाजक रेखा मानी गयी है। स्थूलरूप से वाक्यविन्यास तथा बोलने के लहजों को आधार मानकर हम विभाजन कर रहे हैं।''





अनुक्रमणिका

| तापी थडी | गोमती थडी | भरवाडी | पेलाडी |
|---|---|---|---|
| वांदरु (माकड) | व्हांदरु | वानरु | वांधरु |
| भिवानु (घाबरणे) | डरवानु | डरवानु | डरवानु |
| खाटलो (बाज) | खट्यारु | खाटलो | खाटलु |
| हादणी (खराटा) | खट्टो | खराटो | खट्टो |
| बुढ्ढो (म्हातारा) | धयडो | धयडो | डोसो |

(पटेल, १९९९ : ४२, ४३)

अशा रीतीने अगदी ६० मैलांच्या परिसरातही असे पोटभेद नजरेस पडतात. या पोटभेदांचे कारण प्रस्तुत अभ्यासकाच्या मते असे आहे की, धुळे, नंदुरबार जिल्ह्यात बोलल्या जाणाऱ्या गुर्जर बोलीचे शहादा (जि० नंदुरबार) हे केंद्र आहे. या केंद्राच्या आजूबाजूचा ६० मैलांचा परिसर हा या बोलीचे क्षेत्र मानता येते. या बोलीक्षेत्राला लागून दोन सीमाप्रदेश येतात. शहादा या केंद्रापासून खेतिया हे मध्यप्रदेशातील मोठे गाव अवघे १२ कि०मी०वर आहे तर नवापूर या गुर्जर बोली क्षेत्रापासून उच्छल हे गुजरातचे तालुक्याचे शहर अवघ्या ४ कि०मी०वर आहे. यामुळे 'गोमती थडी' या प्रांतातील गुर्जरी बोलीचे साम्य हिंदीशी तर 'पेलाडी' या प्रांतातील गुर्जरी बोलीचे साम्य गुजरातीची आहे.

'भरवाडी' या प्रांतातील गुर्जरी बोलीत 'बारु', 'ज्युनो', 'बेनझु', 'इनभी' ही उद्‌गारके योजिली जातात. (या उद्‌गारकांना तसा विशिष्ट अर्थ नाही.) 'तापीथडी' या प्रांतातील गुर्जर बोलीत 'लेवा' (घेणे), 'देवा' (देणे), 'करवा' (करणे), 'जवा' (जाणे), 'खावा' (खाणे), 'फुलकाई' (फुलवणे), 'डामराई' (दाखवेगिरी करणे) या विशेष शब्दांचा बहुलतेने वापर होतो. 'गोमती थडी' या प्रांतात 'कुचालु' (कुचाळक्या), 'दांगडो' (गोंधळ), 'गाडची' (गाडी), 'टिपरा' (गरबा नृत्यातील दांडिया) या विशेष शब्दांचा वापर होतो. तर पेलाडी प्रांतात - 'राते' (रात्री), 'डायो' (म्हातारा), 'चोमासो' (चतुर्मास), 'डाचु' (तोंड) या विशेष शब्दांचा वापर होतो, असे डॉ० पटेल यांनी म्हटले आहे.

८) या बोलीक्षेत्रात गुर्जर खर्दे ता० शिरपूर येथे तसेच तालुक्यातील भरवाडे, टेकवाडे, चांदपुरी, वरुळ, अर्थे या गावातील बहुसंख्य गुर्जर बांधव महानुभाव संप्रदायाशी निगडित आहेत. हा भरवाडी प्रांत होय. या प्रांतातील गुर्जर खुर्दे या गावात महानुभावियांचे मठ आजही आहेत. या प्रांतातील बोलीत येणारा 'चाटे' (मुले) हा शब्द लीळाचरित्रात विशेषत: स्वामींच्या 'केलिक्रीडा' या प्रकारच्या लीळांत पुन:पुन्हा येतो. या अंगाने महानुभाव संप्रदाय आणि गुर्जर बोलीचे क्षेत्र यांचा अनुबंध तपासता येऊ शकतो.

**गुर्जरीचे व्याकरण**

१) गुर्जरीत 'ने', 'नो', 'नी', 'नु' ही षष्ठी विभक्तीची प्रत्ययरूपे येतात.
उदा० रमेशने, पाणीनो, पटेलनी, मातानु

२) गुर्जरीत उकारान्त शब्दांचे प्राबल्य आढळते.
उदा० दऊ (देणे), जाडु (जाड), दळु (दळणे), आधु (अर्धे), सुन्नु (सोने), जमाडु (जेवण देणे).

३) क्रियापदांना 'जो' हा आदेशात्मक प्रत्यय लावण्याची रीत दिसते.
उदा० पाडजो, (पाड) वगाडजो, (वाजव) आवजो, (ये) जजो (जा)

४) जेवी-तेवी, जेवु-तेवु (जशी-तशी जसे-तसे) ही संकेतवाचक उभयान्वयी अव्यये योजली जातात.

५) प्रमाणमराठीतील 'ला', 'त' या द्वितीया व सप्तमीच्या प्रत्ययांऐवजी अंत्य प्रत्यय एकारान्त उच्चारले जातात. प्रत्यय लावण्याकडे गुर्जरीचा कल दिसत नाही.
उदा० हाते (हाताला), मळे (मळ्यात), आखे (डोळ्यात), गळे (गळ्यात), घेरे (घरात)

६) 'स' हा प्रत्यय लावून भविष्यकाळी क्रियापदे बनवली जातात.
उदा० लाईस (आणणार), खाईस (खाणार), देईस (देणार).

७) गुर्जरीत क्यारे (केव्हा), केवा (कसा), केम (का), क्या (कुठे), सु (काय) ही प्रश्नार्थक सर्वनामे येतात.

गुर्जरांचा राजकीय इतिहास हा पराक्रमाचा, राजसत्तेचा इतिहास आहे. स्थलांतर कराव्या लागलेल्या जमातीच्या अडचणी, व्यथा, सोसणारा हा समूह आहे. भाषिक अंगाने पाहू जाता या बोलीला स्थलकालपरत्वे भाषिक आक्रमणेही पचवावी लागली आहेत. या बोलीचा सविस्तर अभ्यास होण्याची गरज ही सांस्कृतिक गरज म्हटली पाहिजे. दुर्दैवाने अजूनही ही बोली उपेक्षित आहे. समूहाच्या विकासात भाषिकसत्ता निर्णायक ठरते. तशी ती न लाभल्याने या समूहाचा म्हणावा तसा विकास झाला नाही. डॉ० वरखेडे यांनी भाषिक सत्तेचे महत्त्व विशद करताना म्हटले आहे की, ''अर्थात ज्या समाजात परिश्रमी कार्यकर्ते, साहित्यिक, विचारवंत, व्यापारी साहसी व्यक्ती, आणि संशोधक असतात त्याच समाजाची भाषा विस्तार पावते. एकूण विकासात भाषिक सत्तेचा वाटा फार मोठा असतो, हे निर्णायक सत्य समाजभाषाविज्ञानातून पुढे आले आहे. आपल्या राज्यघटनेनुसार भाषिक अल्पसंख्याकांची भाषा वाचवणे, तिच्या अभिव्यक्तीला वाव देणे आणि भाषिक अडथळ्यांमुळे भाषागटाच्या विकासाच्या संधी हिरावल्या जाऊ नयेत, याची दक्षता घेणे; हे लोकशाही राज्याचे वैधानिक कर्तव्य आहे. याचे कारण भाषा हे केवळ संपर्क-माध्यम नसून ते एक सांस्कृतिक मूल्य आहे, हा विचार.'' (वरखेडे २००६; ३२९)

गुर्जरी बोलीची उपेक्षा थांबावी, अभ्यासकांचे समतोल व न्याय्य दृष्टिक्षेप या बोलीच्या सामर्थ्यावर पडावेत; ही अपेक्षा उचित ठरू शकेल.

**संदर्भ :**

केतकर, डॉ० श्री०व्यं० महाराष्ट्रीय ज्ञानकोश विभाग १२. महाराष्ट्रीय ज्ञानकोश मंडळ, नागपूर, १९२५.

देसाई, डॉ० बापूराव (संपा०), महाराष्ट्रातील समग्र बोलींचे लोकसाहित्य-शास्त्रीय अध्ययन. अनघा प्रकाशन, ठाणे, २००६.

देसाई, डॉ० बापूराव. 'गुर्जरी बोली' समाविष्ट - देसाई. डॉ० बापूराव (संपा०) २००६.

पटेल, डॉ० दिलीप, गुर्जरी लोकसाहित्य. गुर्जरी समाज साहित्य विद्यामंदिर, जयपूर, १९९९.

वरखेडे, डॉ० र०ना०, 'भाषा आणि बोली' परिसरलक्ष्यी व समाजलक्ष्यी दृष्टिकोन समाविष्ट - देसाई, डॉ० बापूराव (संपा०) २००६.

■

32, गणेश कॉलनी, शिरपूर, (जि० धुळे)
चलभाष : 098229 34874

## काव्य, नाट्य आणि नृत्य

'नट' ही संज्ञा सर्वच रंगकर्मींना लागू करण्यात येत असे– नाट्यातील आणि नृत्यातील रंगकर्मींना, नटेश्वर म्हणजे शंकर हे जसे नाट्य-रंगकर्मींचे दैवत तसेच नृत्य-रंगकर्मींचे दैवत.

'नृत्य' ही संज्ञा भरताने व्यापक अर्थाने सर्वच नर्तनाला लावली आहे. केवळ नर्तन म्हणजे 'नृत्त' आणि सभिनय नर्तन म्हणजे 'नृत्य' हा फरक नंतरचा. मात्र आजही आपण 'नृत्य' ही संज्ञा मूळच्या व्यापक अर्थाने पुष्कळदा वापरतो. हा घोटाळा टाळण्यासाठी साभिनय नर्तनासाठी आपण काव्यनृत्य ही संज्ञा वापरू.

काव्याचे आपण भावकाव्य, कथनकाव्य, आणि नाट्यकाव्य असे उपप्रकार मानले आहोत. ते उपप्रकार काव्यनृत्यालाही लागू पडतात असे दिसते.

भावनृत्य हाही वर्तमानकेंद्री स्वसंवाद असतो. कथक किंवा भरतनाट्यम् शैलीमधील एकल काव्यनृत्य पुष्कळदा भावनृत्य स्वरूपाचे असते, एक भावस्थिती पकडून तिचा निरनिराळ्या अंगांनी विस्तार करणे हे अशा नृत्याचे कार्य राहते. सोबत भावकवित्व असेल वा नसेलही.

कथकनृत्य हा भूतकेंद्री अन्यसंवाद असतो. यक्षगान किंवा 'कथा कहे सो कथक' या मूळ प्रकृतीच्या जवळ राहणारे कथक या स्वरूपाचे असते. नृत्याला जोडून येणारे कथनगीत हे त्याला अंगभूत असते.

नाट्यनृत्य हा भविष्यकेंद्री अन्योन्यसंवाद असतो. वगावर आधारलेले लावणीनृत्य किंव अभिजात भारतीय नृत्यावर आधारित अर्वाचीन काळातील 'बॅले' - सदृश् नृत्य या स्वरूपाचे असते. नृत्याला जोडून येणारी नाट्यगीते किंवा नाट्यसंवाद ही त्याला अंगभूत असतात.

- डॉ० अशोक रा० केळकर, 'रुजुवात' पृ० ८५

# अक्कलकुवा तालुक्यातील पावरी बोलीतील उखाणे

प्रकाश श्रीराम साळुंके

म्हणी-वाक्प्रचारांप्रमाणेच उखाण्यांनाही प्राचीन मौखिक परंपरा लाभलेली आहे, महत्त्वाचे स्थान लाभलेले आहे. 'उखाणा' या शब्दाला प्रश्न, कूट, ब्रह्मोद्य, प्रवल्हिका किंवा प्रहेलिका असे संस्कृत प्रतिशब्द आहेत. ग्रामीण भागात उखाण्यांना 'कोडी' किंवा 'आहणा' असेही शब्द वापरले जातात. श्रीमती दुर्गा भागवत म्हणतात, ''आह'' ह्या धातूपासून उखाण्यांची निर्मिती झालेली आहे. 'आह' हा धातू अत्यंत प्राचीन अशा वेदकाळातील वेदवाङ्मयात व तदनंतरच्या संस्कृत वाङ्मयात आढळतो. आज मराठीत 'आह' हा धातू वापरात नसला, तरी 'आहणा' या शब्दात तो बोलीभाषेत वापरलाच जातो.'' आजही खानदेशातील मुख्य बोलीभाषेत म्हणजे अहिराणी बोलीत उखाण्याला 'आहणा' हाच शब्द प्रचलित आहे.

उखाण्यांना वेगवेगळ्या भाषेत वेगवेगळी नावे प्रचलित आहेत. जसे गुजरातीत उखाणो, सिंधीत उखाणी, हिंदीत व बंगालीत पहेली, कानडीत ओगणू किंवा प्रहलिके, तेलुगुत विडीकथ, तामिळीत विडीकदाई इ० वरीलप्रमाणे उखाण्यांना वेगवेगळ्या भाषेत जशी वेगवेगळी नावे आहेत तशीच वेगवेगळ्या आदिवासी जमातीतही वेगवेगळी नावे रूढ आहेत. जसे छोटा नागपूरच्या मुंडा लोकात नुतम कहाणी, गोंड लोकात करसाळ, आदिवासी भिल्ल लोकात जिखण्यो, तसे अक्कलकुवा तालुक्यातील आदिवासी पावरी बोलीत 'सुडवेणन् काण्या' हा शब्द रूढ आहे.

उखाण्याचे स्वरूप प्रश्नोत्तरासारखे असते. उखाण्यातील प्रश्नात गूढार्थ असतो. तर उत्तरातून गोपनीयतेचा स्फोट करून मूलार्थ व्यक्त केला जातो. उखाण्यांची रचना अगदी ठसकेबाज असते. गोपनीयता, कल्पनाचातुर्य आणि उत्कंठावर्धकता ही उखाण्यांची वैशिष्ट्ये असतात. उखाण्यात खटकेबाज व मार्मिक विनोदही असतात. ऐकणाऱ्याला संमोहात टाकून त्याचा गोंधळ उडवणे आणि त्याच्या मनात संभ्रम निर्माण करणे हे उखाण्याचे कौशल्य असते. डॉ० सुधीर कोठवदे म्हणतात,

''उखाणे त्या समाजमानसाची उच्च आकलनक्षमता, सांस्कृतिक परिप्रेक्ष्य आणि जीवनार्थाचे आकलन करण्याचा शहाणपणा व्यक्त करतात.''

उखाण्यात म्हणींप्रमाणे व्यापकता आहे. मनोरंजनाचे व ज्ञानवर्धनाचे ते महत्त्वाचे साधन आहे. मानवी कल्पनांची आणि अनुभवांची अभिव्यक्तीही उखाण्यांमधून होते. म्हणजेच उखाणे मानवाला विचार करण्यासही प्रवृत्त करतात. सामाजिक व्यवहारात, माणसांच्या दैनंदिन वापरात-खाण्यापिण्यात ज्या वस्तू येतात, माणूस नेहमी ज्या पशुपक्ष्यांमध्ये वावरतो त्या सगळ्यांमध्ये उखाण्यांचे स्वरूप पाहायला मिळते. आजही

लग्नप्रसंगात किंवा करमणुकीत उखाणे सांगण्याच्या पद्धती आढळतात. म्हणींप्रमाणे व्यापक असलेले, बुद्धीला चालना देणारे व मनोरंजन करणारे उखाणे प्रत्येक जाती-जमातीच्या बोलीभाषेत प्राचीन काळापासून मौखिक परंपरेने पिढ्यानपिढ्या संक्रमित होत आलेले आहेत.

अक्कलकुवा तालुक्यातील आदिवासी पावरा जमातीच्या पावरी बोलीतही पारंपरिक पद्धतीचे उखाणे प्रचलित आहेत. दिवसभर अंगमेहनतीचे काम करून रात्री एकत्र जमल्यावर मद्यपानासोबत उखाण्यांच्या साहाय्याने ते शारीरिक व मानसिक थकवा घालवतात व आपल्या ज्ञानाचे आदान-प्रदान करतात.

आदिवासी पावरांच्या बोलीतील काही उखाण्यांचे मराठी भाषेत रूपांतर करून त्याचे उत्तर सांगण्याचा प्रयत्न येथे मी केलेला आहे.

(पावरा बोलीतील उखाणा पहिल्या ओळीत, त्याचे प्रमाण मराठी भाषांतर दुसऱ्या ओळीत व त्याचे उत्तर तिसऱ्या ओळीत)

१) ची आवी ची गोयी?
ही आली आणि ही गेली?
नजर

२) मुठ भोरीन तोह नी गोनाय, मेह नी गोनाय?
मूठभर मोजणे देखील कठीण?
केस

३) आयतली सुरी राजाहा बोठ कोयतली?
लहानशी मुलगी राजालाही खाली बस म्हणते?
पायात रुतलेला काटा

४) आयतली सुरी राजाह खिजवतली?
लहानशी मुलगी राजाला चिडवते?
माशी

५) आयतली सुरी राजाहा रडावतली?
लहानशी मुलगी राजालाही रडवते?
कांदा

६) आयतली सुरीन दह पाय?
लहान मुलीला दहा पाय?
खेकडा

७) आथभर डेमणी तोहनी उमकाय मेहनी उमकाय?
हातभर तुकडा तुमच्या हातातही येणार नाही व आमच्या हातातही येणार नाही?
माणसाची सावली

८) देव-देवन पेल्लू टिलू कुणीही लागतलू?
देव-देवतांच्या आधी कुणाला टिळा लावत जातो?
बोटाला

९.) काम कोन्ने ओगे ने खानेवेले फोसी?
आधी काम करणारी आणि नंतर खाणारी?
कोंबडी

१.) एक रंगाम खूप रंग?
एका रंगात अनेक रंग?
अंडे व अंड्यातील पिलू.

११) राती राती भल्ल दिहू दिहू टाल्ल?
रात्री-रात्री भरलेले, दिवसा दिवसा रिकामे?
गुरांचा गोठा

१२) राती राती टाल्ल दिहू दिहू भल्ल?
रात्री-रात्री रिकामे, दिवसा-दिवसा भरलेले?
अंथरूण ठेवण्याची घडवंची

१३) एक दादून डीलम खूप दात?
एका दादाच्या पोटात अनेक दात?
भोपळा

१४) उपर सुत्र, माय आड, माह अने पाई?
वरती साल, मध्ये हाड, मास आणि पाणी?
नारळ

१५) एक दरम दुय आथे हुदवे?
एकाच खड्ड्यात दोन हाताने कुदते?
मुसळ

१६) पानहारखं पान बिनडेट्या पान?
पानासारखं पान बिनदेठाचे पान?
पापड

१७) एक पग हौ आथ?
एकच पाय आणि शंभर हात
साबर (काटेरी वनस्पती)

१८) एक बायरं गरमाय घुमती घुमती बारथे आवे?
एक बाई घरातून घुमत-घुमत बाहेर येते?
झाडू





अनुक्रमणिका

१९) बांड्य गदळं दुवाख मुतं?
बांडे गधडं दोन्ही बाजूला मुतते?
घरावरचे छप्पर

२.) दन्यू आट जाय वेवाणी मर जाय?
रॉकेल आटून जाते आणि वात जळून जाते?
चिमणी

२१) ताबान डेगडीम राय राय बिजा?
तांब्याच्या डेगडीत (हंड्यात) खूप खूप बिया?
उंबर

**उखाण्यांची प्राप्ती**

१) भरत पावरा, देवमोगरा पुनर्वसन
२) वसंत पावरा, देवमोगरा पुनर्वसन
३) उग्रावण्या पावरा, देवमोगरा पुनर्वसन
४) जांभा पावरा, देवमोगरा पुनर्वसन

**संदर्भ :**

१) भागवत, दुर्गा, 'लोकसाहित्याची रूपरेखा', वरदा बुक्स, पुणे. १९७७ (आवृत्ती २).
२) कोठावदे, सुधीर, 'मावची बोली : समाज आणि संस्कृती', आशापुरी प्रकाशन, साक्री. २०००.

■

कला आणि वाणिज्य महाविद्यालय, अक्कलकुवा, जि० नंदुरबार 425 415
चलभाष : 094203 75696

## भाषा प्रयोगातील दोन प्रवृत्ती

भाषाशक्तीचा आविष्कार भाषा प्रयोगात होतो तेव्हा त्यात दोन प्रवृत्ती दिसून येतात. एक प्रवृत्ती असते ती समाजजीवनातील निरनिराळी रूपे आणि अनेक विभाजने यांच्यामुळे भाषाव्यवस्थेत येणाऱ्या विविधतेची, विकेंद्रीकरण होण्याची, भाषाप्रयोगात जीविकागत, प्रदेशगत आणि पिढीगत भेद निर्माण होण्याची आणि भाषांची विविधता कायम राहण्याची. याउलट दुसरी प्रवृत्ती आहे ती परिष्करणाची, प्रमाणीकरणाची, स्थिरीकरणाची, एकरूपतेची. विविध प्रकारच्या जीविका, प्रदेश, पिढ्या जोडण्याची प्रेरणा, प्रबळ केंद्र निर्माण करण्याची प्रेरणा येथे सक्रिय होताना दिसते.

- डॉ० अशोक रा० केळकर, 'रुजुवात' पृ० २४०

# मराठी प्रमाणभाषेच्या लेखनाविषयीची माझी संकल्पना

दिवाकर मोहनी

मराठीची प्रमाणभाषा, बोलण्याची नव्हे तर लिहिण्याची, कशी असावी तर तीमध्ये कोणताही विषय मांडता यावा. शास्त्र किंवा विज्ञान यांची सतत वाढ होत असते म्हणजे त्यांचा परीघ वाढत जातो. त्याचप्रमाणे त्या विषयांची खोलीदेखील वाढत जाते. असे सतत वाढत जाणारे विषय आमच्या भाषेला पेलता यावेत आणि तीमध्ये केलेले लेखन नि:संदिग्ध आणि अल्पाक्षर असावे अशी गरज आहे. अलीकडे लेखननियमांच्या सुलभीकरणाची मागणी होत आहे. सुलभीकरणाची गरज आहे असे मानून मी लेखनाच्या विषयात प्रवेश केला. पण सुलभीकरणाची गरज नाही अशा निष्कर्षाला मी आलो आहे.

भाषण आणि वाचन ह्या दोन्ही क्रियांनी आपणाला काही कळते. भाषण कानांना ऐकू येते किंवा ते ऐकायचे असते. आणि लेखन डोळ्यांनी वाचायचे असते. दोन वेगवेगळ्या इंद्रियांचा उपयोग आपण करीत असतो.

आंधळे लोक कानांनी ऐकून आणि बोटांनी स्पर्श करून पुष्कळ गोष्टी शिकतात. डोळ्यांच्या वापराशिवाय त्यांना विषयाचे आकलन होऊ शकते. जन्मापासून बहिरे असलेले, कर्णेंद्रियाचा वापर अजिबात न करणारे लोक वाचायला शिकू शकतात आणि त्या वाचनातून ज्ञान मिळवू शकतात. याचा अर्थ असा की आपल्याला ज्ञान मिळविण्यासाठी कोणतेही एक इंद्रिय पुरेसे असते. आपण जसे ऐकतो तसेच लिहिले गेले पाहिजे असे काही नाही. कोणतीही परकी भाषा शिकायची झाली तर ती दोन प्रकारे शिकता येते. ऐकून किंवा वाचून. व्याकरणाची पुस्तके, शब्दकोश ह्यांच्या साह्याने तिचे उच्चार कसे होतात हे न समजता कोणतीही भाषा शिकणे सहज शक्य आहे, असे माझ्या लक्षात आले. असे जर आहे तर उच्चाराप्रमाणे लिहिण्याची गरज नाही.

एक काळ असा होता की आपल्या देशात सुशिक्षितांची परस्पर-संपर्काची भाषा संस्कृत होती. बंगालमधले संस्कृत पंडित, केरळमधले आणि पंजाबमधले पंडित संस्कृत ग्रंथांमध्ये लिहिलेल्या शब्दांचा उच्चार आपापल्या पद्धतीने, त्यांच्या मुखाला असलेल्या सवयीप्रमाणे करीत. पण ते उच्चार लेखनात आणण्याचा प्रयत्न त्यांनी कधीच केला नाही. संस्कृत भाषेचे लेखन कधीच उच्चारानुसार झालेले नाही. कारण प्रदेश जितका मोठा तितके उच्चारभेद असणारच.

लेखन उच्चार दाखविणारे कमी, तर अर्थ सांगणारे जास्त हवे हे केवळ संस्कृत भाषेतच नाही तर एका अत्यंत परक्या म्हणजे इंग्रजीसारख्या भाषेमध्येही आहे. एकाच उच्चाराच्या

शब्दांचे स्पेलिंग निरनिराळे करून ते हे कार्य साधतात : SON. SUN: WRITE. RIGHT: BLUE. BLEW: NEW. KNEW वगैरे.

भाषण आतापर्यंत समोरासमोर होत असे म्हणजे एकाच प्रदेशात आणि काळात बोलणारा आणि ऐकणारा असे. त्यामुळे ऐकणाऱ्याला आपले शंकानिरसन तेथल्या तेथे करून घेता येत असे. लेखन मात्र दूरदूरच्या प्रदेशात जाते. इतकेच नव्हे तर लिहिणारा आणि वाचणारा यांच्या काळात काही शतकांचेही अंतर असू शकते. असे लेखन समजून घेताना त्या लेखनाचा उच्चार त्या काळी आणि त्या प्रदेशात कसा होत असे यांच्याशी वाचकाला कसलेही कर्तव्य नसे. आपण वाचताना आपल्याला आलेल्या शंका लेखकाला विचारू शकूच असे नाही, कारण आपण ज्या वेळी ग्रंथ वाचत असू त्या वेळी त्याचा लेखक हयात असेलच असे नाही.

मग एखाद्या शब्दाची शंका फेडायची कशी? अशा वेळी शब्दकोशाचा आश्रय घ्यावा लागतो. क्वचित एखाद्या व्युत्पन्न पंडिताच्या लेखनात तो लेखनाच्या ओघात त्याच्या गरजेप्रमाणे घडवलेले नवीन शब्द वापरतो. त्यांचा अंतर्भाव शब्दकोशांत असेलच असे नाही. अशा ठिकाणी शब्दकोश उपयोगी पडत नाही. पण तो शब्द व्याकरणशुद्ध असेल आणि वाचकालाही तेवढे व्याकरण येत असेल, तर त्याला अशा नव्या शब्दापासूनसुद्धा अर्थबोध होतो. त्या नव्या शब्दाचा उच्चार कसा करायचा हे त्याला माहीत नसले तरी चालते.

लेखननियमांच्या सुलभीकरणाची मागणी करणाऱ्यांना तशी गरज का वाटत असावी असा विचार करीत असता मला एक गोष्ट जाणवली. त्यांना आपली भाषा संस्कृतपासून निघालेली आहे आणि जे संस्कृत चांगल्या प्रकारे शिकले आहेत त्यांनी ती सामान्य जनांवर लादली असे वाटत असावे. भाषा पूर्वी जास्त कठीण होती आणि कालमानाप्रमाणे ती सोपी होत चालली आहे आणि ती आणखी सोपी केली पाहिजे असा त्यांचा समज आहे असेसुद्धा मला जाणवले.

येथे मी एक विवाद्य विधान करतो, ते असे की मराठी किंवा तिच्यासारख्या अन्य भारतीय भाषा संस्कृतपासून निघालेल्या नाहीत. संस्कृत त्यांची जननी नाही. आपल्या आजच्या भाषा संस्कृत-प्रभावित आहेत; संस्कृतोद्भव नाहीत असे माझे मत आहे. पण तो वेगळा विषय असल्याकारणाने त्याचा येथे विस्तार करीत नाही.

आपल्या भाषेच्या लेखननियमांचे सुलभीकरण करावे अशी मागणी करणाऱ्यांनी एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे की अशी मागणी केल्यामुळे त्यांच्या ठिकाणी आकलनशक्ती किंवा बुद्धिमत्ता कमी आहे असा समज पसरतो. वास्तव तसे नसल्यामुळे सुलभीकरणाची मागणी त्यांनी टाकून द्यावी, अशी माझी त्यांना नम्र विनंती आहे.

ज्याला शुद्धलेखनाचे जुने नियम म्हणतात त्या नियमांनुसार लिहिलेले वाचायला मला आवडते. याचे कारण असे की त्यातील प्रत्येक वाक्य मला एखाद्या गोफासारखे विणलेले

दिसते. कोणत्याही नामाचे लिंग, वचन आणि विभक्ती सतत डोळ्यांसमोर असते. क्रियापदाच्या समोर असलेल्या रूपावरून काळ, कर्त्याचे लिंग, वचन आणि पुरुष ही सारी पुष्कळशा वेळी बरोबर समजतात. नाव (होडी) आणि नाव (नाम) ह्यांतला फरक डोळ्यांना दिसावा म्हणून नाम या अर्थाने जेव्हा तो शब्द लिहिला जातो तेव्हा त्यातल्या 'ना' वर अर्थभेददर्शक अनुच्चारित अनुस्वार पूर्वी देत असत तो आता काढून टाकला आहे आणि आपणांस संदर्भावर अवलंबून राहण्यास सांगितले आहे. येथे प्रश्न असा आहे की अर्थभेददर्शक अनुस्वार फक्त नाव किंवा तत्सम शब्दांवरच आहे काय? 'मला खाऊ दे' हे वाक्य पूर्वी दोन पद्धतीने लिहिले जात होते. 'मला खाऊ दे' आणि 'मला खाऊं दे' पहिल्या 'खाऊ' चा अर्थ 'मला खाण्याचा पदार्थ दे' असा आहे. आणि दुसऱ्या अनुच्चारित अनुस्वारयुक्त 'खाऊं'चा 'अर्थ मला खाण्याची क्रिया करू दे' असा होतो. खाऊ हे एका ठिकाणी नाम आहे तर दुसऱ्या ठिकाणी साहाय्यक क्रियापद आहे. येथे जो बिंदुचिन्हाचा वापर झाला आहे त्यामुळे त्या शब्दाच्या नव्हे, वाक्याच्या ठिकाणी निश्चितार्थ आला आहे. तेवढ्या एका टिंबाने पुष्कळ मोठा संदर्भ मनात निर्माण करण्याचे कार्य केले आहे. हेच वाक्य आपण सुटे वाचले आणि त्यातला अनुच्चारित अनुस्वार नको म्हणून तो दिला नाही तर खाऊ हे नाम की क्रियापद हे कळायला मार्ग नाही. हे वाक्य ज्या वेळेला उच्चारले जाते आणि ते कानांनी ऐकले जाते त्या वेळी संदर्भ तेथे उपस्थित असतो. हे वाक्य डोळ्यांनी वाचत असताना तेथे आविर्भाव नसतात. उच्चारात हेल नसतात आणि त्या वाक्याचा अर्थ स्वतंत्रपणे समजून घेण्याची सोय नसते. जुन्या पद्धतीच्या लेखननियमांत ती सोय होती.

फक्त नाम आणि क्रियापद यांतला फरक दाखविण्यासाठीच टिंबाचा उपयोग होत होता काय? नाही. तो नामाची विभक्ती दाखविण्यासाठीही होत होता. 'मी गावाला गेलो आणि मी पुस्तक वाचले' ह्या दोन वाक्यांतील पहिल्या 'मी' ची विभक्ती प्रथमा आहे आणि दुसऱ्या 'मीं'ची विभक्ती तृतीया आहे. 'डोळ्यांनी बघतो ध्वनी परिसतो कानी पदी चालतो' या चरणाचा कर्ता 'मी' की 'तो' हे तेथे हा अनुच्चारित अनुस्वार काढून टाकल्यामुळे समजण्याचा मार्ग खुंटला आहे. बघतो, परिसतो, चालतो, चाखतो वगैरे क्रियापदे प्रथमपुरुषी आणि तृतीयपुरुषी कर्ता असताना त्यांचा उच्चार समान असला तरी प्रथमपुरुषी क्रियापदाच्या अंत्याक्षरावर टिंब असते. त्या एका टिंबामुळे वाक्याच्या कर्त्याचा पुरुष माहीत होतो. 'घोडे पळाले' येथे एक घोडे की पुष्कळ घोडे पळाले, हे सांगण्यासाठीसुद्धा अनुच्चारित अनुस्वाराचा उपयोग होत होता. 'घोडें पळालें' येथे कर्ता नपुंसकलिंगी आहे आणि एकवचनी आहे, हे त्या अनुस्वाराच्या योगाने स्पष्ट होते. दिवाळी-दिवाळीं, वांचाल-वाचाल, जिवाणूं-जीवाणू असे प्रत्येक शब्दाच्या ठिकाणी निश्चितार्थ येण्यासाठी जुने शुद्धलेखन जास्त उपयुक्त आहे, अशा निष्कर्षाला मी आलो आहे. पूर्वीच्या हस्तलेखनात दोन शब्दांमध्ये अंतर ठेवण्याचा प्रघात नव्हता. त्यामुळे दिनचर्या आणि दीन चर्या अशांसारखे शब्द जोडून लिहिले जात होते. ह्या दोन शब्दांतील

अर्थभेद स्पष्ट करण्यासाठी उच्चाराचे ऱ्हस्व-दीर्घत्व सांभाळण्याची गरज आहे. भाषेमध्ये सतत नवनवीन शब्द येतात. त्यांपैकी काहींचे उच्चार पूर्वीच्या एखाद्या शब्दासारखे असू शकतात. अशा दोन शब्दांमधील अर्थभेद स्पष्ट व्हावा यासाठी त्यातील स्वरांचे ऱ्हस्व-दीर्घत्व बदलून वा अनुच्चारित अनुस्वाराचा उपयोग करून अर्थभेद दाखविण्याचे कार्य होऊ शकते. पुढे तीन शब्द मी लिहीत आहे. कोणत्याही शब्दाचे अर्थनिश्चयन करण्यासाठी बिंदुचिन्हाचा उपयोग कसा होतो ते दाखविण्यासाठी आहेत. अंगकाठी, जरीकाठी आणि इंद्रायणीकाठी. पूर्वीच्या नियमानुसार ते अंगकाठी, जरीकांठी आणि इंद्रायणीकांठीं असे लिहिले जात असत. काठ हा शब्द किनारा या अर्थाने वापरला गेल्यास 'कां'वर टिंब देण्याचा प्रघात होता. आणि नदीकांठींमध्ये काठ या शब्दाची सप्तमी विभक्ती आहे हे त्या टिंबाने स्पष्ट होत होते.

नामांपासून अव्यये डोळ्यांना वेगळी ओळखता यावीत ह्यासाठी अव्यये ऱ्हस्वान्त ठेवली जात असत. किंवा ऱ्हस्व करणे शक्य नसल्यास त्यांवर अनुच्चारित अनुस्वार दिला जात असे. 'आणी' हे क्रियापद आणि 'आणि' हे अव्यय डोळ्यांना वेगळे दिसावे ह्यासाठी तसे लिहिले जात होते. 'यथाशक्ती' सारखी अव्यये आजही ऱ्हस्वान्त लिहिली जावीत, असा नियम आहे. पण अव्यये म्हणजे काय हे माहीत नसल्यामुळे आणि सगळेच शब्दांच्या अंती येणारे इकार उकार दीर्घान्त लिहावे एवढाच नियम माहीत असल्यामुळे ते दीर्घान्त लिहिले जाऊ लागले आहेत. मुळे हे नाम आणि मुळें अव्यय; साठी हे नाम व साठीं हे अव्यय. 'तो जाता झाला', 'जातां जातां गाडीत त्याने पुस्तक वाचले.' ह्या वाक्यांतील पहिला जाता आणि पुढचे जातां जातां ह्यांमधला अर्थभेद डोळ्यांना दाखविण्याची सोय आम्ही गमावली आहे आणि प्रत्येक ठिकाणी संदर्भ लक्षात ठेवण्याची गरज निर्माण केली आहे.

वाचताना संदर्भावर कमीतकमी अवलंबावे लागावे ह्यासाठी शब्दांच्या लेखनामध्ये फरक करण्याची पद्धत बहुतेक सगळ्याच भाषांमध्ये आहे. उर्दूमध्ये तीन भाषांचे मिश्रण आहे. अरबी, फारसी आणि हिंदी. तिचे लेखन पुष्कळसे फारसीप्रमाणे करण्याची पद्धत आहे. परंतु तीमध्ये अरबी शब्द अरबीसारखेच लिहिले जातात. एकच किंवा जवळचे उच्चार दाखविणारी तीन-तीन व्यंजने आहेत. परंतु कधीही एका व्यंजनाची जागा ते दुसऱ्या व्यंजनाला घेऊ देत नाहीत. इंग्लिशमध्येही अर्थभेद दाखविण्यासाठी शब्दाच्या लिखित रूपाने निश्चित अर्थ दाखवावा, अशी सोय असल्याचे पूर्वी सांगितले आहे.

मुद्रणपूर्व काळात पद्य बाळबोधीत (देवनागरीत) आणि गद्य मोडीत लिहिले जात होते. पद्य अल्पाक्षर आणि छंदोबद्ध असल्याकारणाने त्यामध्ये अर्थबोधासाठी त्याचा अन्वय करण्याची गरज असते. त्याचप्रमाणे त्यामध्ये छंदाच्या गरजेसाठी ऱ्हस्व-दीर्घाचे बंधन पाळणेही गरजेचे असते. अन्वय करणे सोपे जावे ह्यासाठी लिंग-वचन-विभक्तीच्या, त्याचप्रमाणे काळाच्या आणि अर्थाच्या खुणा सगळ्या शब्दांना अंगावर वागवाव्या लागतात. इतकेच नव्हे तर काही शब्दांचे व प्रत्ययांचे अध्याहरण करावे लागते.

पद्यलेखनाच्या वरील गरजांसाठी घडलेले लेखनाचे नियम आपण नंतर गद्यातही वापरू लागलो. हे गद्य मुख्यतः मुद्रणासाठी लिहिले गेले. (आपसातला पत्रव्यवहार मोडीमध्ये चालू होता. मोडीमध्ये एकच वेलांटी आणि एकच उकार आहे. आणि उच्चारित अनुस्वाराचादेखील वापर होत नाही.)

हे सारे घडले ते मुद्रणाच्या गरजेमुळे पण त्याच वेळी मराठीचा इंग्रजीशी संपर्क वाढत चालला होता. आणि आपल्या भाषेमध्ये तोवर कधीच न आलेल्या विषयांचा अंतर्भाव होऊ लागला होता. ह्या नवीन विषयांसाठी नवे पारिभाषिक शब्द घडविण्याची गरज होती आणि ते घडविण्यासाठी संस्कृत भाषेचा आश्रय करावा लागणे अपरिहार्य होते. हे पारिभाषिक शब्द पूर्णपणे नवीन असल्याकारणाने ते कोशगत झाले नव्हते. म्हणून त्या शब्दांचे आकलन होण्यासाठी संस्कृतच्या व्याकरणाच्या ज्ञानाची गरज होती. ते शब्द आपल्या भाषेत पुढे रुळल्यामुळे त्यांच्या ठिकाणी सातत्य हा गुण आला आणि त्या सातत्यामुळेसुद्धा त्यांच्यात निश्चितार्थता आली. भाषेला या शब्दांमुळे प्रौढत्व आणि सौष्ठव प्राप्त झाले. हे सारे शब्द संस्कृत भाषेच्या नियमांप्रमाणे घडविल्यामुळे ते कोणाच्याही उच्चाराप्रमाणे लिहिले गेले नाहीत. तर मुळाप्रमाणे (तत्सम) लिहिले गेले. ह्या नव्या, संस्कृतातून घेतलेल्या, शब्दांची संख्या जशी मराठीत वाढू लागली तशी मोडीलिपी त्यांच्या वापरासाठी अपुरी पडू लागली.

एखादा नवीन विषय भाषेमध्ये आणायचा हे मोठे अवघड काम आहे. त्या विषयाचे आकलन होण्यासाठी वाचकांच्या ठिकाणी कोणतेही संदर्भ असत नाहीत. कारण तो विषय त्यांच्यासाठी पूर्णतया नवीन असतो. तेवढ्याचसाठी प्रत्येक शब्दाने संदर्भावर अवलंबून न राहता नेमका अर्थ व्यक्त करावा अशी गरज असते. हे काम उच्चारानुसारी लेखनामुळे होऊ शकत नाही. कारण त्या शब्दांच्या योगे उच्चार व्यक्त करावयाचा नसतो तर वाचकाच्या मनामध्ये अर्थाचे संक्रमण करावयाचे असते. त्यासाठी ते व्याकरणशुद्ध असावे लागतात. एकदा हे शब्द भाषेत रूढ झाल्यानंतर ते वाचकांच्या डोळ्यांना परिचित झाले. इतकेच नव्हे तर त्या शब्दांपासून एकच अर्थ व्यक्त व्हावा ह्यासाठी त्यांच्या लेखनात सातत्य राखावे लागले. त्या शब्दांना कोशगत करावे लागले. त्यांच्या लेखनात सातत्य राखल्यामुळे एक आनुषंगिक गुण त्यांना प्राप्त झाला. ते ओझरते पाहूनदेखील त्यांचा अर्थ (नित्य परिचयामुळे) वाचकाला समजू लागला.

मराठीच्या बोलीभाषा ह्या घरांत, शेतात किंवा रणांगणावर वापरण्यासाठी घडलेल्या आहेत. रणांच्या गरजेसाठी घडवलेल्या भाषेत देश्य शब्दांच्या बरोबर काही परकीय म्हणजे फारसी, अरबी आणि पोर्तुगीज शब्दही आले. पण ज्या वेळी मराठी ही तीन क्षेत्रे सोडून विज्ञानाच्या वा तत्त्वज्ञानाच्या सभामंडपात शिरली त्या वेळी तिला संस्कृत भाषेचा आश्रय करावा लागला. आणि तत्सम शब्दांचा तिच्यात भरणा झाला. आमची मराठी बोली पारिभाषिक शब्दांच्या बाबतीत पूर्णपणे परावलंबी आहे. ह्या परावलंबनामुळे बोलीभाषांची स्वतंत्रपणे होऊ शकणारी वाढ खुंटून गेली. न्यायालयात वापरण्यासाठी संविधानासारखे

ग्रंथ रचण्यासाठी वा विश्वकोशातील नोंदी लिहिण्यासाठी जी भाषा वापरावी लागते, ती पूर्णपणे संस्कृतनिष्ठ असल्याकारणाने आमच्या बोलीपासून फार दुरावलेली आहे. परंतु नाइलाजास्तव तीच वापरणे भाग आहे.

अंदाजे गेल्या साठ वर्षांपासून मराठी भाषेच्या शिक्षणाकडे आपले दुर्लक्ष आहे. मला येथे मुद्दा मांडावासा वाटतो तो असा की आम्ही जसे बोलतो तसे लिहितो किंवा तसे लिहावयास पाहिजे ह्या आपल्या समजामुळे ''मातृभाषा काय शिकवायची?'' असे आम्हांस वाटू लागले. भाषेच्या शिक्षणाच्या नावाने आम्ही थोडे साहित्य शिकविले; परंतु भाषेचे व्याकरण व शब्दांची घडण ह्या दोन गोष्टी शिकविण्याकडे आम्ही पूर्ण दुर्लक्ष केले. कोणतीही भाषा फक्त साहित्य व त्यातही ललित साहित्य लिहिण्यासाठी वापरली जात नाही. तर तिच्यात जीवनावश्यक सगळेच विषय लिहिले-बोलले जातात. भाषा जर चांगली नसेल तर त्या विषयांच्या संकल्पना स्पष्ट होत नाहीत. वाढ खुंटते. गेल्या अनेक वर्षांत, साहित्याचा प्रांत सोडल्यास आपल्या भाषेतून नवीन विचार मांडले गेले नाहीत ते यामुळेच.

भाषण कानांसाठी आहे व लेखन डोळ्यांसाठी हे आपण पूर्वी पाहिलेले आहे. येथे सांगायचे ते असे की, वाचन श्रवणापेक्षा कठीण आहे, त्रासदायक आहे. तोंडाने आवाज करणे व तो कानांनी ऐकणे हे बहुतेक सगळे चार पायांचे प्राणीसुद्धा करतात. ही त्यांची क्षमता माणसांत आली आहे इतकेच नव्हे तर अन्य प्राण्यांपेक्षा पुष्कळ निरनिराळ्या प्रकारचे आवाज काढणे त्याला शक्य झाले आहे. दृश्य संकेत हे अगदी अलीकडे म्हणजे पाचसहा हजार वर्षांपासून माणूस वापरू लागला आहे. हातांनी निरनिराळी चिन्हे काढून त्यांच्या योगाने अर्थबोध करून देणे हे मानवाच्या इतिहासात अगदी नवीन आहे. परंतु त्याचा वापर झपाट्याने वाढणार आहे. कानांनी ऐकताना अर्थबोध करून घेण्यासाठी पूर्ण वाक्य ऐकावे लागते. आणि डोळ्यांनी वाचताना अक्षरनूअक्षर वाचण्याची गरज नसते हे आपणांस ठाऊक आहे. कानांना सिक्वेन्शियल ॲक्सेस (क्रमेण) असतो आणि डोळ्यांना रँडम ॲक्सेस (यादृच्छिक) असतो. तेवढ्यामुळेच वाचन लवकर होते. मुद्रण सुरू झाल्यापासून माणसाला वाचनाची गती वाढविणे भाग पडले आहे, आणि शक्यही झाले आहे. सगळ्यांचीच वाचनाची गती दिवसेंदिवस वाढवावी लागणार आणि ते साध्य व्हावे म्हणून मुद्रणात एकसारखेपणा ठेवणे आवश्यक झाले आहे. मुद्रणात एकसारखेपणा असल्याशिवाय वाचनाची गती वाढू शकत नाही. एकसारखेपणा ठेवण्याच्या गरजेमुळेच शुद्धलेखनाचे नियम करावे लागतात आणि जुन्या-नव्या पुस्तकांमध्ये लेखनविषयक सातत्य राखावे लागते.

लेखननियम सुलभ करण्याचा हेतू, ते सर्वांच्या आटोक्यात यावेत हा असतो. पण सगळ्या लोकांची क्षमता सारखी नसते. जे सगळ्यांना सहजपणे अमलात आणता येतील असे नियम अमलात आणणे इष्ट आहे असा समज आहे. पण तो चुकीचा आहे. कारण सध्या सुलभ केलेले नियमही फारच थोड्यांना वापरता येतात व सोपे करण्याच्या भानगडीत त्यांत विसंगती आल्यामुळे ते कठीणही झाले आहेत.

येथे प्रश्न हा पडतो की, गणित हा विषयही सर्वांच्या आटोक्यातला नाही. पण म्हणून गणितातील नियम (सूत्रे) बदलायची का? की शिकविण्याच्या पद्धती बदलायच्या? बीजगणित आणि शून्यलब्धी हे विषय पुष्कळांना जड जातात म्हणून ते कायमचे काढून टाकायचे का?

आज आपल्या भाषेतल्या लेखननियमांच्या बदलत्या स्वरूपामुळे परभाषी लोक मराठी भाषा शिकायला धजत नाहीत. त्याचप्रमाणे जुन्या शुद्धलेखनाचे नियम गेली साठ वर्षे शाळांमधून न शिकविल्यामुळे प्राचीन मराठी वाङ्मयाचा आस्वाद आज कोणालाच घेता येत नाही. व आमची साहित्याची उज्ज्वल परंपराच नष्टप्राय झाल्यामुळे एक मोठी सांस्कृतिक पोकळी निर्माण झालेली मला जाणवते, ती आपल्याला का जाणवत नाही? ही कोण आणि कशी भरून काढणार? चिपळूणकरांच्या पूर्वीचे सर्व गद्य व केशवसुतांच्या पूर्वीचे सर्व पद्य यथामूल म्हणजे जुन्या लेखननियमांप्रमाणेच लिहावे हा नवा नियम करून तर अधिकच गोंधळ निर्माण झाला आहे. त्यामुळे काही 'नळी फुंकली सोनारे इकडून तिकडे गेले वारे' ह्यासारख्या म्हणी कशा लिहायच्या असा प्रश्न पडतो. त्या म्हणी चिपळूणकरपूर्वकालीन की उत्तरकालीन, हे कसे ठरवायचे? सोनारें ही सोनार या शब्दाची तृतीया विभक्ती आहे. आणि व्याकरणाच्या नियमाप्रमाणे तृतीया विभक्तीच्या सर्व प्रत्ययांवर अनुच्चारित अनुस्वार देणे आवश्यक आहे. व्याकरण हे शास्त्र पॉझिटिव्ह सायन्स आहे, ते नॉर्मेटिव्ह सायन्स नाही. आपली भाषा पूर्वी कशी लिहिली गेली एवढेच व्याकरणशास्त्र सांगते. पुढे ती कशी लिहावी हे सांगण्याचा अधिकार व्याकरणाला नाही. लिहिलेल्या भाषेचे व्याकरण आणि बोलीभाषेचे व्याकरण ह्या दोन गोष्टी भिन्न आहेत. बोली प्रत्येक दहा कोसांवर बदलते. इतकेच नव्हे तर ती महाराष्ट्रात प्रत्येक जातीप्रमाणेही बदलते. त्यामुळे बोलीचे एकच एक व्याकरण अशक्यप्राय आहे. व्याकरणामध्ये लिंग, वचन आणि विभक्ती इत्यादींचे विकार नामांना कसे होत आले आहेत त्यांचे वर्णन असते. बोलींत ठिकठिकाणी ते विकार बदलतात. त्यामुळे मराठीच्या बोलीभाषांचे एक व्याकरण होऊ शकत नाही. बोलीभाषेतले शब्द प्रमाणभाषेत घेण्यात कसलीच आडकाठी नाही. फक्त ते घेताना त्या त्या शब्दाचे लिंग ठरवून त्याची अनेकवचनी रूपे कशी होतील आणि सामान्य रूप कसे होईल ह्याचा निर्णय करणे व ती कोशगत करणे आवश्यक असते. कोणत्याही भाषेमध्ये शब्दांची भर सतत पडावयासच पाहिजे आणि बोलीभाषेतून मोठ्या संख्येने ते घेतले जावेत.

प्रमाणभाषेचे नियम फक्त छापील मजकुराला लागतात. छापील म्हणजे सार्वजनिक मजकुराला लागतात. खाजगी मजकूर त्यांपासून मुक्त असतो. कोणताही मजकूर छापण्यापूर्वी तो जाणकारांनी पाहून छापण्यास द्यावयाचा असतो. पूर्वीचे प्रकाशक आणि मुद्रकसुद्धा हे काम नियमितपणे करीत होते.

प्रमाणभाषा ही सगळ्यांनाच परकीय भाषेसारखी शिकवायला पाहिजे कारण ती बोलीभाषेपासून अगदी वेगळी असते. ती उच्चारबोधक असण्यापेक्षा जास्त प्रमाणात

अर्थबोधक असते. ती इतिहासाकडे वळलेली असते आणि ती कानांसाठी नसून डोळ्यांसाठी असते.

येथे मराठी भाषेची इंग्रजीशी केलेली तुलना अप्रस्तुत होणार नाही. इंग्रजी आता ज्ञानभाषा म्हणून जगात प्रतिष्ठा पावली आहे. तिचा शब्दसंग्रह विशाल आहे. हा शब्दसंग्रह त्या भाषेने इतर भाषांमधून उचल केल्यामुळेच वाढला आहे. तांत्रिक, वैज्ञानिक त्याचप्रमाणे तत्त्वज्ञानाचे विषय जेव्हा इंग्रजीला नवीन होते तेव्हा तिने ग्रीक आणि लॅटिन भाषेतून शब्द घेऊन आपली निकड भागवली. त्यानंतर जसजसा इतर भाषांशी तिचा संपर्क वाढला तसतसे त्या भाषांतले शब्द तिने आत्मसात केले. ते तसे करताना त्या शब्दांचे स्पेलिंग कसे करावयाचे हे ठरविले म्हणजे त्यांना तत्सम शब्दांसारखे वागवून कोशामध्ये स्थान दिले. ते एकदा कोशगत झाल्यानंतर त्यांच्या स्पेलिंगमध्ये कधीही बदल घडू दिला नाही.

इंग्लंडमधल्या लोकांची मातृभाषा 'प्रमाणभूत इंग्लिश' आहे असे आपण समजतो. परंतु ते बरोबर नाही. तेथे पुष्कळ बोली आहेत आणि त्यांचा वापर त्या-त्या प्रदेशात अनौपचारिकपणे होत असतो. इंग्लंडमधील लोकांची मातृभाषा जरी इंग्लिश असली आणि त्यांना आयुष्यभरात दुसरी भाषा शिकण्याची गरज नसली तरी तेथल्या सर्व नागरिकांना प्रमाणइंग्लिश बिनचूक लिहिता येते असे नाही. औपचारिक प्रसंगी वापरावयाची भाषा सर्वांनाच वेगळी शिकावी लागते. आणि काही जणच तीमध्ये प्रवीण होतात. ते तिचे लेखनविषयक नियम काटेकोरपणे पाळतात. एकदा स्वीकारलेल्या प्रमाणभाषेत त्यांनी वेळोवेळी बदल केला आहे असे आढळत नाही. आमच्या देशात अर्थातच इंग्लंडमधील बोलीभाषा शिकवल्या जात नाहीत. प्रमाण इंग्रजी भाषाच शिकवली जाते. आणि त्या आमच्यासाठी नवख्या असलेल्या भाषेचे नियम आम्ही सगळेच निमूटपणे पाळतो.

आपली भाषा ज्ञानभाषा व्हावी असे जर आपल्याला वाटत असेल तर तिला शास्त्रशुद्ध बैठकीवरच बसवावे लागेल. आणि तिचे शिक्षण औपचारिकपणे सर्वांना घ्यावे लागेल. इंग्रजी भाषा जशी आपण तिच्या व्याकरणाविषयी कुरकुर न करता स्वीकारतो, तिच्यामधील शब्दांचे स्पेलिंग पाठ करतो, तसेच आपल्याही औपचारिक मराठी भाषेचे म्हणजेच प्रमाणभाषेचे नियम आपण स्वीकारले पाहिजेत. त्याचप्रमाणे जुन्या-नव्या नियमांमध्ये सातत्य राखले पाहिजे.

■

123, गौरीवंदन, शिवाजीनगर, नागपूर 440 010
चलभाष : 098819 00608

# मराठीकरण, भाषिक देवघेव, समृद्धी इ०

सुशान्त शंकर देवळेकर

'भाषा आणि जीवन'च्या (व० २८, अं० ३) अंकात आलेला 'संगणकव्यवहाराचे मराठीकरण' हा लेख 'उपक्रम' ह्या संकेतस्थळावर घातला गेला व त्याला प्रतिसाद देताना माझ्या लेखातील काही मुद्द्यांबाबत काही उपक्रमींनी मतभेद व्यक्त केले आहेत. त्या संदर्भातील काही मुद्द्यांचे स्पष्टीकरण करण्याचा इथे प्रयत्न केला आहे.

उद्दिष्टांत जे मुद्दे आले आहेत ते शब्द कोणते घ्यायचे ह्याविषयी आलेले नसून मराठीकरण का करायचे ह्याविषयी आहेत. व्यावहारिक विचार करायचा तर मुळात मराठीकरण करण्यात जी शक्ती घालवायची ती कशासाठी असा प्रश्न निर्माण होतो. सध्याच्या सामाजिक-राजकीय परिस्थितीचा विचार केला तर मराठीकरण न करणे हे अधिक सोयीचे आहे. तरीही जर मराठीकरण करायचेच असे ठरवले तर त्याची उद्दिष्टे लेखात दिलेल्या क्रमाने असतील. पहिले अस्मितेचा आविष्कार हे उद्दिष्ट असेल तर मराठीकरण केलेच पाहिजे. दुसरे भाषासमृद्धी हे उद्दिष्ट मानले तर मराठीकरण करणे बरे ठरेल. तिसरे आकलनसुलभता हेच उद्दिष्ट असेल तर ते साधण्यासाठी मराठीकरण केलेच पाहिजे असे नाही. त्यासाठी इतर मार्ग उपलब्ध आहेत.

भाषाभाषांतील देवघेव आणि भाषासमृद्धी ह्याबद्दल एक समज असा आहे की इतर भाषांतील शब्द स्वीकारल्याने भाषा समृद्ध होते. मला हा समज पूर्णपणे पटत नाही. भाषेची समृद्धी आपण कशी मोजतो हा खरा प्रश्न आहे.

त्यातला सर्वांत सोपा मार्ग म्हणजे भाषेतील (संकल्पनांचे वैविध्य दाखवणाऱ्या) शब्दांची संख्या पाहणे (समान संकल्पना असणारे शब्द तात्पुरते वगळून). ह्या दृष्टीने विचार केला तर इतर भाषांतल्या शब्दांमुळे भाषा समृद्ध होते हे खरे आहे. पण त्यासाठी इतर भाषांतून शब्द घेणे अटळ नाही. कारण माझ्या भाषेत तितक्या संकल्पना व्यक्त करणारे शब्द मी घडवू शकलो तरी भाषा समृद्ध होणारच असते.

भाषेची समृद्धी दुसऱ्या प्रकारेही मोजता येईल. मला ही समृद्धी अधिक महत्त्वाची वाटते. एखादी भाषा मानवी जीवनातील किती प्रकारच्या व्यवहारांत वापरण्यात येते हे पाहता येईल. अशा व्यवहाराची परंपरा त्या भाषेत किती प्रमाणात रुजली आहे ह्यानुसार तिची समृद्धी जोखता येईल. अशा तऱ्हेच्या समृद्धीत इतर भाषांतून येणारे शब्द काही वाटा उचलू शकतील. पण तेही अनिवार्य नाही. इथेही मी त्या शब्दांऐवजी स्वतःच्या भाषेत नव्या संज्ञा घडवल्या तर समृद्धी उणावणार नसतेच. थोडक्यात भाषेची समृद्धी आणि शब्दांची देवघेव ह्यांचा तर्कदृष्ट्या अनिवार्य संबंध नाही. त्यामुळे भाषासमृद्धीसाठी इतर भाषांतून शब्द घ्यायलाच हवेत असे नाही.



अनुक्रमणिका

इंग्रजी भाषेने इतर भाषांतून शब्द घेतले आहेत ह्याचा त्या भाषेच्या समृद्धीची संबंध जोडता येणार नाही. इंग्रजी भाषा समृद्ध आहे, कारण त्या भाषेला विविध जीवनक्षेत्रांतील व्यवहाराची मोठी परंपरा आहे. इंग्रजी भाषकांचे राजकीय वर्चस्व, त्यांची ज्ञानलालसा, ह्या दोहोंतून उभ्या राहिलेल्या ज्ञानव्यवहार आणि इतर व्यवहार ह्यांच्या व्यवस्था ही त्या परंपरेची कारणे आहेत. इंग्रजी ही केवळ इंग्रजांनी दुसऱ्या भाषांतून शब्द घेतले म्हणून समृद्ध झाली नाही. तसे म्हणणे हा काकतालीय न्याय झाला. त्यांनी जगभरातले ज्ञान आपल्या भाषेत आणले आणि नव्या ज्ञानाच्या परंपरा आपल्या भाषेतून आरंभल्या. 'इतर भाषांतले शब्द घेतले म्हणून इंग्रजी समृद्ध झाली' असा संबंध नसून 'इंग्रजी भाषा समृद्ध झाली आणि तिने इतर भाषांतले शब्दही स्वीकारले' असा संबंध आहे. विविध भाषकांचा संबंध आल्याने त्यांच्या भाषांतील शब्दांचीही देवघेव होत असते. ते साहजिक आहे. पण तिचा समृद्धीशी कारण म्हणून संबंध जोडणे हे योग्य नाही. तात्पर्य इतर भाषांतील शब्द घेतल्याने भाषा समृद्ध होते ही कारणमीमांसा मला मान्य नसल्याने इतर भाषांतून शब्द घेतल्याने इंग्रजी समृद्ध झाली हेही मला मान्य नाही. त्यामुळे तशा प्रकारची तथाकथित समृद्धी ही प्रशंसनीय वा निंद्य वाटण्याचे कारणच नाही.

इतर भाषांतले शब्द घेणे हे समृद्धीचे कारण नसले तरी तसे घेण्यात सोय आहे की नाही? सोय आहे हे मान्य करायला पाहिजे. विशेषतः आपण ज्या परिस्थितीत आहोत तिथे. नव्या ज्ञानाची निर्मिती, मांडणी आपल्याकडे आपल्या भाषांतून क्वचितच होते. त्यामुळे एखाद्या नव्या ज्ञानाची ओळख आपल्याला इंग्रजीद्वारे होते. त्यासंदर्भातील संकल्पना आपण इंग्रजी संज्ञा वापरूनच शिकतो. त्या संकल्पनासंबंधीचा व्यवहारही मुख्यत्वे इंग्रजी भाषेतून किंवा इंग्रजी भाषेतील संज्ञा वापरून होत असतो. मराठीत आपण जो व्यवहार करणार तो बऱ्याचदा फक्त उपयोजनात्मक असतो. अशा वेळी मराठीत वेगळी संज्ञा तयार करणे, तिचा संकेत रूढ करण्याचा प्रयत्न करणे ही कामे अधिक कष्टाची आहेत हे खरे आहे. त्यातून आपला उद्देश हा केवळ आकलन होणे इतकाच असेल तर नव्या संज्ञेपेक्षा परिचित अशी जुनीच संज्ञा अधिक सोयीची.

वरील युक्तिवाद नक्कीच प्रभावी आहे. पण तरीही मला तो स्वीकारावासा वाटत नाही. एक तर केवळ सोय हा मुद्दा नेहमीच विवेकी असेल असे नाही. सर्वांनीच आपापल्या भाषा सोडून इंग्रजीतच व्यवहार करणे हे अधिक सोयीचे आहे असेही कुणी पटवून देऊ शकेल. असे सांगणारे लोक मला भेटले आहेत. दुसरे म्हणजे मराठी संज्ञा घडवणे हेच मला अधिक सोयीचे वाटते. ह्याची कारणे दोन आहेत. १. राजकीय बलाबलाचा मुद्दा २. बौद्धिक आनंदाचा मुद्दा.

मी इंग्रजीतील कोणतीही संज्ञा मराठीत वापरू नये अशा मताचा नाही. पण इंग्रजीतून कमीत कमी संज्ञा स्वीकाराव्या अशा मताचा नक्कीच आहे. ह्याचे कारण इंग्रजी आणि मराठी ह्या भाषांचे सामाजिक-राजकीय बलाबल. इंग्रजी आणि मराठी ह्यांचा संबंध आपापल्या स्थानी राहून समृद्ध होणे आणि देवघेव करीत राहणे इतकाच नाही, तर किती जीवनक्षेत्रांतील व्यवहारांत कुणी टिकून राहावे असा आहे. उद्या मराठी भाषकांची भाषा





अनुक्रमणिका

बदलली तर ती कोणती भाषा होण्याची शक्यता अधिक आहे? तर ती भाषा इंग्रजी असेल हे उघड आहे. मराठी भाषकांनी इंग्रजी शब्द वापरणे म्हणजे केवळ आपली सोय पाहणे इतकाच अर्थ नाही. तर ह्या व्यवहारात मराठी शब्द वापरणे शक्य नाही असे मान्य करणेही आहे. मराठीचे वापरक्षेत्र उणावून इंग्रजीचे वापरक्षेत्र वाढवणे असाही आहे.

पण इंग्रजी संज्ञा नाकारून नुसत्या मराठी संज्ञा वापरल्याने मराठीचे सामाजिक-राजकीय बल वाढेल असे थोडेच आहे? नुसत्या मराठी संज्ञा वापरल्याने मराठीचे सामाजिक-राजकीय बल वाढेल हे काही शक्य वाटत नाही. पण तसे करून मराठीचे वेगळेपण आणि स्पर्धेत असणे अधोरेखित होईल. एखादी गोष्ट टिकून राहण्यासाठी पहिल्यांदा तिचे वेगळे अस्तित्व टिकून राहावे लागते. मराठी जिंकेल की नाही हे शेवटी बलाबलानेच ठरेल.

दुसरा मुद्दा असा आहे की नवीन संज्ञा घडवणे आणि तिचा संकेत रूढ करणे हे कष्टाचे असले तरी आनंद देणारे काम आहे असे मला वाटते. नवीन संज्ञा घडवताना त्या संकल्पनेचा परिचय अधिक दृढ होतो. संलग्न संकल्पना अधिक नेमकेपणे उमगून येतात. आपण संकल्पनांच्या अधिक जवळ जातो. आपल्या भाषेचे सामर्थ्य तिच्या मर्यादा ह्यांची जाण प्रगल्भ होते. अर्थात घडवलेली प्रत्येकच संज्ञा अशी असते असे म्हणणे नाही. पण ह्या प्रक्रियेबद्दल आस्था असणारांचा असा अनुभव आहे. ह्या कारणांमुळे मला नव्या संज्ञा घडवण्याचा मार्ग अधिक योग्य वाटतो.

संज्ञा घडवणे आणि ती रूढ होणे / करणे ह्या दोन वेगळ्या प्रक्रिया आहेत. संज्ञेचा अर्थ कळण्यासाठी कोणत्या तरी मार्गाने संकेत उमजावा लागतो. नव्या संज्ञा घडवणे शक्य आहे कारण संकेत समजावून देणे शक्य आहे. संज्ञा रूढ करण्यासाठी मात्र कळणे पुरेसे नाही. पुरेशा वारंवारतेने ती संज्ञा त्या विशिष्ट संदर्भात वापरण्यात आली पाहिजे. भ्रमणध्वनी ही संज्ञा कशासाठी वापरतात हे मराठीशिक्षित व्यक्तींना आजकाल माहीत असते. त्याचा वापर कमी प्रमाणात का होईना होतो. पण जो रूढ होण्यासाठी अनिल थत्ते ह्यांची वृत्तपत्रांतून वारंवार येणारी जाहिरातही कारणीभूत ठरली आहे. ड्राइव्हला 'खण' म्हटल्याने पहिल्या वेळी त्यामागची संकल्पना कळणार नाही हे मला मान्य आहे. पण ती कधीच कळणार नाही असे नाही. किंबहुना मी प्रात्यक्षिक दाखवत 'खण' हा शब्द वापरला तर कळायला अडचणही येणार नाही. ड्राइव्ह ह्या शब्दाचा संगणकासंबंधीचा अर्थ मला तरी असाच कळला होता. तेच खण ह्या संज्ञेबाबतही घडेल.

भाषाशुद्धीच्या भूमिकेमुळे रुळलेल्या शब्दांची हकालपट्टी होते आणि त्यामुळे भाषा बोजड/दुर्बोध होते असा एक मुद्दा आहे. दुर्बोधपणा रुळलेले शब्द बदलल्यामुळे अवतरतो हा ध्वनी मात्र सर्वस्वी योग्य नाही. जर दिलेला पर्याय चांगला नसेल तर दुर्बोधपणा येऊ शकेल. पण असे नेहमीच होईल असे नाही. दुर्बोधपणा टळावा ह्यासाठी काही काळजी घ्यावी लागेल. ट्रॅक्टरला शासन-व्यवहार-कोशात कर्षित्र असा पर्याय सुचवला आहे. तो नक्कीच दुर्बोध आहे. पण त्याऐवजी नांगरगाडा म्हटले तर ते दुर्बोध वाटणार नाही.

भाषेतले शब्द हे केवळ भाषाशुद्धीच्या चळवळीमुळेच बदलतात असे नाही. वेगवेगळ्या प्रभावांमुळेही बदलतात. अलीकडे इंग्रजीच्या प्रतिष्ठेमुळे अनेक लोक रूढ मराठी शब्दांच्या जागी सर्रास इंग्रजी शब्द वापरतात. सोमवारला मण्डे, भाताला राईस, वाढण्याला सर्व्ह कर, नवऱ्याला मिष्टर, बायकोला मिसेस, चुलतभावाला/आतेभावाला/मामेभावाला कझीन असे म्हणतात. ते हेतुतः करत नसतील पण त्यामुळे रुळलेले शब्द हद्दपार होतच असतात. खरे तर भाषा बदलते हे एकदा मान्य केले की ती वेगवेगळ्या कारणांनी बदलू शकते हे आलेच.

परकीय शब्दांना मराठीची व्याकरणव्यवस्था लावून मराठी करून घेणे हा एक मार्ग आहे आणि तो मला मान्य आहे. पण तो मी सगळीकडे वापरणार नाही. मला चांगली मराठी संज्ञा सुचत असेल तर मी ती आधी वापरीन. 'क्लिक्'करता मला 'टिकटिकव' हा धातू सुचला. त्यामुळे मी 'अमुक अमुक ठिकाणी टिकटिकवा' असे म्हणतो. संज्ञा सुचत नसेल तिथे मराठी व्याकरण लावून ते शब्द चालतील.

भाषेत खऱ्या अर्थी लोकशाही असते, लोक जे शब्द वापरतात तेच टिकून राहतात; हे मत बरोबर असेल तर मग कुणी रूढ शब्दांना वेगळ्या संज्ञा वापरल्या तर आपण त्याला बिचकायचे खरे तर कारणच नाही; पण आपण बिचकतो ह्याचे कारण लोकांनी कोणते शब्द वापरावे ह्याबद्दल आपल्या काही धारणा असतात आणि कोणत्या तरी प्रभावामुळे लोक कोणते शब्द वापरतात हे बदलू शकेल हे आपल्याला जाणवत असते. हा प्रभाव अनेक प्रकारचा असू शकतो. प्रतिष्ठितांच्या भाषेचा, कोणत्या तरी चळवळीचा, बदलत्या परिस्थितीचा इ० त्यामुळे नव्या संज्ञा घडवा इंग्रजीतल्या सरसकट वापरू नका हे म्हणणाऱ्यांचाही काही प्रभाव पडणे शक्य आहे.

आणखी एक महत्त्वाचा मुद्दा म्हणजे आपण ह्या सर्व संज्ञा घडवू पण संगणकाच्या पडद्यावर मला इंग्रजीच संज्ञा दिसणार असतील आणि व्यवहारात इतरांशी बोलताना त्याच वापराव्या लागणार असतील तर हा व्यापार व्यर्थ नव्हे का? मुद्दा अत्यंत योग्य आहे. त्याचे अंतिम उत्तर आज माझ्यापाशी नाही. पण परिस्थिती आहे तशीच राहत नाही. प्रयत्नांनी समाजात काही बदल घडवता येतात ह्यावर माझा विश्वास आहे. तोवर चांगल्या मराठी संज्ञा घडवता आल्या तर त्या घडवाव्या, रुळवता आल्या तर रुळवाव्या असा प्रयत्न नक्की करता येईल.

■

42/बी भिवंडीवाला बिल्डिंग, तिसरा माळा, वरळी, मुंबई 400 018
चलभाष : 097698 35310
ई-पत्ता : sushant.devlekar@gmail.com





अनुक्रमणिका

# हिंदुस्थानची इंग्रजी भाषेला देणगी - चार अल्पपरिचित शब्द

अरविंद कोल्हटकर

ब्रिटिश आणि अन्य युरोपीय देशांशी घनिष्ट संबंध निर्माण झाल्यापासून भारतीय आणि युरोपीय भाषांमध्ये शब्दांची देवाणघेवाण चालू झाली आहे आणि तिची अनेक उदाहरणे आपण प्रत्यही पाहत असतो. अशाच देवाणघेवाणीतील त्यामानाने अल्पपरिचित अशा चार शब्दांच्या कथा पुढे मांडल्या आहेत.

गोंडवन अर्थात गोंड लोक राहतात तो प्रदेश हा शब्द आपल्या परिचयाचा आहे. 'गोंडवनातील प्रियंवदा' ह्या आपल्या कादंबरीच्या शीर्षकात ज्ञानकोशकार केतकरांनी ह्या शब्दाचा वापर केला आहे. ह्याच शब्दापासून उत्पन्न झालेला 'गोंडवनलँड' हा थोडासा पुनरुक्तिदोष असलेला शब्द आज भूगर्भशास्त्रात एक महत्त्वाचा पारिभाषिक शब्द बनलेला आहे. शब्दाचा हा प्रवास कसा घडला ह्या प्रश्नाचे उत्तर इंटरनेटवर थोडा शोध घेतल्यावर सापडते.[१]

पृथ्वीवरील निरनिराळे भूभाग स्थिर नसून पृथ्वीच्या अंतर्भागातील घडामोडींमुळे ते एकमेकांपासून सतत दूर सरकत असतात अथवा एकमेकांवर आदळत असतात, हा सिद्धांत प्लेट टेक्टॉनिक्स ह्या नावाने भूगर्भशास्त्रात आज सर्वमान्य झालेला आहे. १५ ते २० कोटी वर्षांपूर्वी आजचे दक्षिण अमेरिका, आफ्रिका, अरबस्तान, भारत, ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड आणि अंटार्क्टिका हे सर्व भूभाग सलग जोडलेले आणि दक्षिण गोलार्धात होते आणि तेथून विलग होऊन ते एकमेकांपासून दूर झाले आणि आज दिसतात तेथे येऊन पोहोचले. एकेकाळी अस्तित्वात असलेल्या त्या महाखंडाला भूगर्भशास्त्रात गोंडवनलँड अशी संज्ञा देण्यात आली आहे. एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभापासून ब्रिटिश राजवटीचा प्रभाव गोंड आणि अन्य जमाती राहत असलेल्या मध्यभारतातील अरण्यांपर्यंत जाऊन पोहोचला आणि गोंडांचा प्रदेश अशा अर्थाने गोंडवन हा शब्द ब्रिटिश सत्ताधारी वर्गाच्या सरकारी भाषेत समाविष्ट झाला. त्या भागात आढळणाऱ्या आणि थराथरांनी बनलेल्या भूगर्भातील प्रस्तरांच्या रचनेचे वर्णन करण्यासाठी गोंडवन हा पारिभाषिक शब्द ब्रिटिश अभ्यासकांनी नवीनच उदयाला येऊ घातलेल्या भूगर्भशास्त्रात समाविष्ट केला. एडुआर्ड सुएस नावाच्या विएन्नास्थित जर्मन शास्त्रज्ञाने 'पृथ्वीचा चेहरामोहरा'[२] अशा शीर्षकाचे एक महत्त्वाचे पुस्तक १८८५ साली लिहिले. त्या पुस्तकामध्ये भूगर्भशास्त्राला तोवर माहीत असलेल्या सर्व गोष्टींचा उल्लेख केला गेला होता. आणि तेथेच गोंडवनलँड हा शब्द पहिल्यांदा जागतिक पातळीवर जाऊन पोहोचला. कालांतराने प्लेट टेक्टॉनिक्स ही संकल्पना निर्माण झाली आणि तेथे उपरिनिर्दिष्ट महाखंडाला हीच संज्ञा प्राप्त झाली.





अनुक्रमणिका

दुसरा शब्द म्हणजे इंग्रजीत, विशेषत: अमेरिकन इंग्रजीत, आढळणारा 'बॉस्टन ब्रॅह्मिन'[३] हा शब्दप्रचार. इंग्लंडातून स्थलांतर करून अमेरिकेच्या उत्तरपूर्व किनाऱ्यावर प्रॉटेस्टंटांनी प्रथम वसाहती निर्माण केल्या. बॉस्टन शहराचा पाया ह्या मंडळींनीच घातला. सुरुवातीच्या काळामध्ये संस्कृती, कला, शिक्षण, लेखन, राजकारण अशा सर्व क्षेत्रांत ह्या कुटुंबांचा वरचष्मा होता. त्यामुळे समाजाच्या वरच्या थरातील ह्या काही डझन कुटुंबांना बॉस्टन ब्रॅह्मिन ही संज्ञा मिळाली. ह्या संज्ञेचे जनकत्व ऑलिवर वेंडेल होम्स सीनियर (१८०९-१८९४) ह्यांच्याकडे जाते. ते व्यवसायाने डॉक्टर होते आणि 'अटलांटिक मंथली' ह्या नव्यानेच स्थापन झालेल्या मासिकात ते लिखाणही करीत. हे भारदस्त मासिक अजूनही चालू आहे. त्याच्या जानेवारी १८६०च्या अंकामध्ये छापून आलेल्या 'एका प्रोफेसरची गोष्ट' अशा शीर्षकाच्या कथेत होम्सनी ह्या शब्दप्रचाराचा पहिला वापर केला.[४] (जाताजाता दोन उल्लेख करावेसे वाटतात. उल्लेख करावेसे वाटतात. वैद्यकशास्त्रात नव्यानेच उत्पन्न होत असलेल्या भूल देण्याच्या प्रक्रियेला ॲनस्थीसिआ हे नाव ह्यांनीच दिले. ह्यांचेच पुत्र पुढे प्रसिद्धीस आलेले अमेरिकन सुप्रीम कोर्टाचे प्रख्यात न्यायाधीश ऑलिवर वेंडेल होम्स ज्युनियर (१८४१-१९३५). १९०२ ते १९३२ अशा प्रदीर्घ काळात ते सुप्रीम कोर्टाचे न्यायाधीश होते. 'क्लिअर अँड प्रेझेंट डेंजर' 'ड्यू प्रोसेस ऑफ लॉ' अशा सर्वपरिचित संज्ञा त्यांनी निर्माण केलेल्या आहेत.[५] ह्यानंतरचा शब्द आहे 'ब्राह्मन बुल' किंवा नुसता 'ब्राह्मन'[६]. हा बैल युरोपीय बैलापासून थोडा निराळा आहे. मुळात हिंदुस्थानातील गीर आणि कांकरेज (गुजरात), नेल्लोर (आंध्र प्रदेश) येथून विसाव्या शतकाच्या प्रारंभी बैलांची ही जात अमेरिका खंडात निर्यात झाली आणि लवकरच उष्ण हवामानाला तोंड देण्याच्या तिच्या गुणामुळे तिचा प्रसार उत्तर आणि दक्षिण अमेरिकेत, तसेच ऑस्ट्रेलियामध्ये वेगाने झाला. हिंदुस्थानाशी असलेल्या ह्या संबंधामुळे बैलांच्या ह्या जातीला 'ब्राह्मण' असे नाव पडले आणि ते अजूनही वापरात आहे[७]. ह्या जातीच्या प्राण्यांचे प्रजनन आज व्यापारी पद्धतीने मांसासाठी केले जाते.

चौथा शब्द 'डूलाली टॅप' अर्थात देवळाली ताप.[८] हिंदुस्थानात सेवा केलेल्या ब्रिटिश सैनिकांच्या बोलीभाषेतील मूळचा हा शब्द आता सर्वसामान्य भाषेचा भाग बनला आहे. ब्रिटिश सैन्य अथवा हवाई दलात काम केलेल्या माझ्या काही मित्रांच्या सांगण्यानुसार साठ सालापर्यंत सर्व जुन्या सैनिकांना हा शब्द चांगला परिचयाचा होता. त्याची कहाणी अशी. देवळालीमध्ये ब्रिटिश सैनिकांचा जो तळ होता तेथेच युद्धामुळे मनावर परिणाम झालेल्या ब्रिटिश सैनिकांना उपचारार्थ पाठवीत असत आणि त्यांच्यापैकी अधिक वाईट स्थिती असलेल्यांना इंग्लंडला रवाना करीत असत. भ्रमिष्ट वर्तणूक करणाऱ्याला देवळाली ताप अथवा 'डूलाली टॅप' झाला आहे असे म्हणण्याची पद्धत त्यामुळे पडली.

बंबैय्या हिंदीमध्ये 'बिंदास' हा शब्द ज्या अर्थाने वापरला जातो त्याच अर्थाने 'डूलाली'चाही वापर इंग्रजीमध्ये आज होता दिसतो. इंटरनेटवर अशा कित्येक जागा पाहावयास मिळतात. पुण्याजवळ कोंढवा भागात सुरू झालेले एक बुटीक हॉटेल त्यांनीच

तयार केलेली एक 'बुटीक बियर' डूलाली ह्या नावाने विकतात असे मला इंटरनेटवरच दिसले.

आंग्ल-भारतीय शब्दांचा विख्यात शब्दकोश हॉबसन जॉबसन येथे मात्र प्रस्तुत शब्द दिसत नाही.[९]

**टिपा :**

१) http://www.thestudy.net.au/projects/gondwana-name.html
२) Das Antlitz der Erde.
३) Boston Brahmin.
४) 'The Professor's Story.' Atlantic Monthly January 1860. http://digital.library.cornell.edu/a/atla/index.html ह्या संकेतस्थळावर ही गोष्ट मुळातून वाचावयास उपलब्ध आहे. तेथे पृ० ९३ पाहा.
५) http://en.wikipedia.org/wiki/Oliver_Wendell_Holmes_Sr, http://en.wikipedia.org/wiki/Oliver_Wendell_Holmes_Jr.
६) प्राणिशास्त्रीय नाव 'Bos primigenius indicus'
७) http://en.wikipedia.org/wiki/Brahman_(cattle), http://www.cattle.com/articles/title/Brahman+Cattle.aspx.
८) Deolali/Doolaly Tap.
९) http://dsal.uchicago.edu/dictionaries/hobsonjobson/index.html.

■

ई-पत्ता : akolhatkar@rogers.com

मोहरमच्या सणात शोक व्यक्त करण्यासाठी मुस्लीम मंडळी या 'हसन, या हुसेन' असा आक्रोश करतात. 'हाय दोस्त दूलाह बेधूला' असे म्हणत छाती पिटतात. भराभर उच्चारताना ('जा पोरी जा'चं जसं 'झपूर्झा' झालं) पहिल्या तीन शब्दाचं 'हैदोसधुल्ला' झालं. इंग्रजांच्या कानांना 'या हसन या हुसेन' हे शब्द अनाकलनीय भासत. रमजानची वर्णने विलायतेस कळवणाऱ्यांनी या शोकघोषाचा कधी 'जॅक्सम बॉक्सम', तर कधी 'हॉब्सन-जॉब्सन' असा उल्लेख केला. भारतातील कंपनीच्या गोऱ्या नोकरवर्गात अगदी ओळखीचा असणारा हा वाक्प्रचार कोशाच्या वेगळ्या वाटेकडे लक्ष वेधणारा ठरला. शिवाय रचनाकर्त्यांच्या जोडगोळीचाही अप्रत्यक्ष निर्देश त्यात सूचित झाला (अ व्हेल्ड इंटिमेशन ऑफ ड्युअल ऑथरशिप).

- श्री०बा० जोशी ('उत्तम मध्यम'मधील 'हॉब्सन-जॉब्सन'मधून)
(प्रेषक : विजय पाध्ये)

# भाषेवर वर्चस्व कुणाचं?

मनोहर राईलकर

'भाषा आणि जीवन'च्या पावसाळा २००४ (२२:३) च्या अंकात वृषाली देहाडरायांचा 'गमती भाषेच्या' अशा शीर्षकाचा लेख आहे. प्रत्यक्षात असं काही असतं का, ह्याबद्दल मला शंका आहे. कारण तशी उदाहरणं घेऊन भाषेवर स्त्रियांचंच वर्चस्व असतं, हे मी दाखवू शकेन. तोच ह्या लेखाचा उद्देश आहे. खरं तर भाषा ह्या शब्दापासूनच ह्या वर्चस्वाची 'सुरुवात' होते. (आरंभ होतो, असं मुद्दामच म्हटलं नाही!)

श्रीमती देहाडरायांनी पुंलिंगी आणि नपुंसकलिंगी एकाच पोतडीत बांधली आहेत आणि संस्कृतचा विचार केला तर त्यात पाच अष्टमांश तथ्यही आहे. कारण आठ विभक्तींपैकी (पुन्हा स्त्रीलिंगीच?) प्रथमा, द्वितीया, संबोधन वगळता सगळ्या प्रकारच्या नपुंसकलिंगी शब्दांची रूपं पुंलिंगी शब्दांसारखीच असतात. आणि संबोधन शब्द जरी नपुंसकलिंगी असला तरी (ती) विभक्तीच!

श्रीमती देहाडरायांनी दिलेली काही उदाहरणंच घेऊन आपण पाहू या. त्या म्हणतात, मोठा असेल तर डबा आणि लहान असेल तर डबी. पण अगदीच लहान असलं तर त्याला डबडं म्हणतात ना. मोठा असेल तो बंगला आणि लहान असेल ती झोपडी. त्यावर मी असं म्हणतो की तो बंगला असला तरी दहा-दहा पंधरा-पंधरा मजली इमारत 'ती'च असते की! इतकासा असलेला खटारा पुंलिंगीच पण लांबलचक सोळा-अठरा-वीस डब्यांची झाली तरी रेल्वेगाडी स्त्रीलिंगीच. (अगदी 'मेल' गाडी असली तरीसुद्धा). म्हणजे आकारावरून लिंग ठरतं असं काही सिद्ध होत नाही. एखादा प्रचंड दगड, पत्थर जरी पुंलिंगी असला तरी इमारतीची कोनशिलाच नाव मिळवून आणि भाव खाऊन जाते की नाही? आणि तेही कायमचं! बिचारे पत्थर कायमचे पायात गाडले जातात. त्यांना पुन्हा कधी सूर्यदर्शन होण्याचा सुतराम् संभव नाही. भूकंपात मोठमोठाली बांधकामं उद्ध्वस्त झाली तरी त्या कोनशिला तशाच तगल्याची प्रकाशचित्रं तुम्ही पाहिली नाहीत का?

प्रकाशचित्रं नावावरून आठवलं! वास्तविक 'प्रकाश'चित्र हा शास्त्रशुद्ध शब्द. पण फोटोकरता प्रथम 'छाया'चित्र हेच नाव कुणीतरी ठरवलं आणि आता कितीही धडपड केली तरी 'प्रकाश'वरची छायेची छाया काही जाणार नाही. ती 'प्रकाश'ला ग्रासूनच राहणार. कारण शास्त्राद्रूढिर्बलीयसी। पुन्हा इथंही नपुंसकलिंगी शास्त्रापेक्षा स्त्रीलिंगी रूढीच प्रभावी! अहो एवढा मोठा सूर्य. पण पृथ्वीच्या पावपट असलेल्या चंद्राची छाया त्याला झाकतेच की नाही? शिवाय स्त्रीलिंगी पृथ्वीची स्त्रीलिंगी छाया पुंलिंगी चंद्रालाही ग्रासतेच की!

एक आंबा पुंलिंगी असला तरी आंब्यांच्या शेकडो झाडांची आमराई स्त्रीलिंगीच असते. आणि तो कागद असला तरी अनेक कागदांची वही किंवा चोपडी स्त्रीलिंगीच! अनेक पुंलिंगी दुवे एकत्र जोडल्यावरच स्त्रीलिंगी साखळी बनते ना? आणि अनेक पुंलिंगी डबे जोडल्यानंतरच स्त्रीलिंगी रेल्वे बनते.

जरी दरवाजा स्वतः पुंलिंगी असला तरी त्याला जन्मभर स्त्रीलिंगी चौकटीतच अडकून राहावं लागते, हे तर सर्वज्ञातच आहे. आणि त्याचं काम बंद करणाऱ्या कडीची सर्वांवर कडीच नाही का? अनेक नारळ एकाच पेंडीच्या आश्रयाला असतात. कितीही पुरुष असले तरी त्यांची समितीच बनते. पैसा पुंलिंगी असला तरी त्याला स्त्रियांच्या पर्समध्येच राहावं लागतं. आणि फार झाला तर तो तिजोरीत किंवा बँकेच्याच आश्रयाला जातो. सर्वत्र स्त्रियाच! परकर, पायजमा पुंलिंगी असले तरी स्त्रीलिंगी नाडीशिवाय जागेवर राहतात काय? हार आणि हारातले मणी भले पुंलिंगी असतील. पण त्या सर्व मण्यांना एकत्र बांधून हाराच्या पायरीपर्यंत नेणारी दोरीच की नाही? पुन्हा पायरीसुद्धा स्त्रीच.

शिवणारा दोरा स्वतः पुंलिंगी असला तरी त्याला सुई जशी नेईल, तिच्यामागून तसंच फरफटत जावं लागतं, हा सार्वत्रिक अनुभव आहे. शिवाय करून सवरून मोकळी होते, ती सुईच. दोरा तिथंच अडकून राहतो, कायमचा, जन्मभराच्या गाठी! पुन्हा दोऱ्याची कधीच मुक्तता होऊ नये म्हणून त्याला आधी आणि शेवटीही मारलेल्या गाठीही स्त्रीलिंगीच की! पतंगही पुंलिंगी असला तरी त्याचं नियंत्रण स्त्रीलिंगी दोरीच करीत राहते ना? आणि काही कारणानं तीच कापली गेली तर बिचारा पतंग! कुठंतरी भरकटत जातो. मुसळ जरी नपुंसकलिंगी असलं तरी त्याला उखळीच्या बाहेर जाता येत नाहीच. गेलंच तर कांडणाऱ्याच्या किंवा कांडणारणीच्या पायावर दणका! पलंग खरा तर पुंलिंगी. पण त्यावर गादी, चादर असल्याशिवाय निरुपयोगीच ना?

ओंडका जरी पुंलिंगी असला तरी त्याला कापणारी करवत स्त्रीलिंगीच असते. शंख जरी पुंलिंगी असला तरी त्याला ज्या अडणीवर बसून राहावं लागतं ती स्त्रीलिंगीच असते. तीच गत माठाची. त्यालाही तिवईच्या आश्रयानंच राहावं लागतं. खिळ्याला भिंतीच्या अंतरंगात शिरायचं असलं तर डोक्यावर स्त्रीलिंगी हातोडीचे घाव सहन करावे लागतातच. एरवी भिंत त्याला दाद थोडीच देईल? इतकंच काय, तो खिळा भिंतीतून पुन्हा उपटून बाहेर काढायचा झाला तर, नावाप्रमाणंच मजबूत पकड असलेली पकडच लागते. अहो बिचाऱ्या पुंलिंगी दगडालाही टाकीचे किंवा छिन्नीचे घाव सोसल्याशिवाय देवपण मिळतं का कधी?

पायात काटा गेला तर त्यालाही हुसकावून, उपटून काढण्याकरता सुईच लागते. आणि पुंलिंगी आजाराला पळवून लावण्याकरताही सुईच लागते. चंद्र तो असला तरी त्याला पृथ्वीच्या कक्षेतच फिरावं लागतं!

दुसऱ्याच्या (झाडाच्या किंवा वृक्षाच्या) आधारावर वाढणाऱ्या वेलीला स्त्रीलिंगी मानलं जातं आणि जगावं लागतं, असं श्रीमती देहाडराय म्हणतात. पण वेल शब्द पुंलिंगीही आहेच. काल्यांचा, तोंडलीचा, पडवळाचा, भोपळ्याचा वेल असतो. त्यांच्या आधारानंच

कार्ली, टोमॅटो, भोपळा, कलिंगड सर्व पुंलिंगी आणि नपुंसकलिंगी मंडळी वाढतात. वेलु जरी गगनावरि गेला तरी बिचाऱ्या भोपळ्याला कुठंही जाता येत नाही, कायमचं जमिनी (!) वरच अडकून पडावं लागतं. शिवाय, ह्या सर्वच वेलांना वाढण्याकरता झाडाच्या फांदीचा किंवा जमिनीत रोवलेल्या काठीचाच आधार लागतो.

संगणक तर पुंलिंगीच. अगदी परम १०,००० क्षमतेचा झाला तरी. पण, सर्वार्थानं त्या संगणकाचं नियंत्रण करण्याकरता चिप नावाची जी क्षुद्र आयसी लागते, ती तर स्त्रीलिंगीच नाही का?

वास्तविक पूर्वीच्या काळी लेखनाकरता बोरू वापरले जायचे. त्याला नीट तासून त्याची जीभ कापावी लागे. तेव्हा ती 'द्विजिह्वा न च सर्पिणी' बाई चुरुचुरू लेखन कार्य करी. आणि बोरू जरी पुंलिंगी असला तरी त्याचं काव्यमय वर्णन लेखणी याच सदरात केलं जाई. कशानंही लिहिलं तरी कुणी लेखनकार्यासारखं बोरनकार्य किंवा बोरीव काम म्हणत नसे. म्हणून तर 'साहित्यिकांनो लेखण्या मोडा आणि तरवारी घ्या', असं आवाहन केलं गेलं. आणि आमच्या लहानपणी तरवार श्रेष्ठ की लेखणी श्रेष्ठ असा वाद रंगत असे. तिथं कुणी बोरू शब्द वापरीत नसे. रंगणाऱ्या दोन्ही स्त्रियाच!

ही नावं बघा सीताराम किंवा जानकीजीवनराम, राधाकृष्ण किंवा राधामोहन, उमामहेश्वर किंवा उमाशंकर, लक्ष्मीनारायण, किंवा रमामाधव सर्व नावांत स्त्रिया प्रथम! इतकंच कशाला? शंकराला आवाहन करायचं तर पार्वतीपते असं म्हणून मगच हरहर महादेव म्हणावं लागतं. आणि रामालाही सीतापते राम असंच संबोधावं लागतं ना?

आता तंबोरा पाहू. त्याचा दांडा आणि भोपळासुद्धा पुंलिंगीच. पण तारा, त्या ज्यांच्यावरून जातात त्या घोड्या आणि तारा सुरांत लावण्याकरता पिळायच्या खुंट्या. सगळं महिलामंडळच! पण इतक्यानं भागतंय होय? सुरांना गांभीर्य प्राप्त व्हावं म्हणून जवार लावायची तीही स्त्रीलिंगीच. तेव्हा कुठं त्या गवयाचं समाधान व्हायचं! आणि त्याच्या गळ्यातून सा लागायचा!

आता एक शेवटचा मुद्दा. तबला किंवा पखवाज पुंलिंगी. पण एरवी त्यांना नुसतंच खोड (नपुंसकलिंगी. स्त्रीलिंगी नव्हे!) असं नामाभिधान असतं. त्यांना मढवण्याकरता पुडी लागते. मुळात कातडं (नपुं०) त्याचीच पुडी होते. त्या पुडीला शाई लावावी लागते, तिला चाट लागते. त्या पुडीला सर्व बाजूंनी वेणी घालायची, त्या वेणीतून वादी ओवायची. वादीला पुरेसा ताण राहण्याकरता खुंट्या अडकवायच्या. मगच तो मढवला जायचा. पण हे सर्व महिलामंडळच. पण तेवढ्यानं भागलं म्हणता का? हातोडीनं सर्व बाजूनं त्याला व्यवस्थित ठोकल्याशिवाय तो सुरांत बोलेल का? नाव नाही. पखवाजाची तर फारच दयनीय अवस्था. कारण त्याला दोन्ही बाजूंनी स्त्रीलिंगी पुड्या लावून मढवायचा. वरचं सगळं महिलामंडळ तर हवंच. पण एका बाजूनं तबल्यासारखा आहे म्हणून हातोडीनं ठोकून तो जरी सुरांत लावला तरी तो मृदुंग, म्हणजे ज्याचं अंगही स्त्रीलिंगी मातीचं आहे, त्यालाही मुखलेप हवाच. हा मुखलेप (पुं०) वाटत असला तरी प्रत्यक्षात कणीकच

(स्त्री०) वापरायची! मगच तो मधुरध्वनी करतो. शिवाय दोन्ही बाजूंनी स्त्रियांनी जखडलेल्या अवस्थेत बिचाऱ्याला दोन्ही हातांनी वादकाच्या थपडा (!) खाव्या लागतात. आणि त्या खाताना थापेचा (!) मधुर आवाज केल्याशिवाय गत्यंतरच नाही! हाय रे दैवा! ■

'मृण्मयी', 56 जेधे नगर, बिबवेवाडी, पुणे 411 037
स्थिरभाष : (020) 2422 0566
चलभाष : 098220 67619
ई-पत्ता : railkar.m@gmail.com

## लेखकांसाठी सूचना

१. पुढील विषयांसंबंधीचे लेखन 'भाषा आणि जीवन' ला हवे आहे : मराठी, अन्य देशीविदेशी भाषा, भाषांची तुलना (शब्दघटना, रचनावैशिष्ट्ये इ०) भाषाविज्ञान, भाषांतर, शैली (व्यवहारातील व साहित्यातील), भाषिक व भाषाशिक्षणविषयक संशोधन, परिभाषा, भाषिक वर्तन, भाषाविषयक शैक्षणिक, शासकीय धोरणे, पुस्तक-परीक्षणे, पानपूरके, पत्रिकेतील प्रकाशित मजकुराबद्दल प्रतिक्रिया, आपली भाषिक प्रचीती, मराठीच्या प्रादेशिक, व्यवसायविशिष्ट, वयोगटविशिष्ट, लिंगविशिष्ट बोलींची वैशिष्ट्ये, मराठी भाषेवरील इतर भाषांचा परिणाम, कवितांचे शैलीवैज्ञानिक विश्लेषण, कवितेची भाषा, साहित्याची भाषा, परिभाषाकोशांचा परिचय / परीक्षणे.

२. लेखकांनी पुढील पथ्ये पाळावीत :
   (अ) कागदाच्या एकाच बाजूस, सुवाच्य लिहावे.
   (आ) लेखनाच्या पाकिटावर पुरेशी टपाल-तिकिटे लावावीत.
   (इ) लेखाच्या अखेरीस स्वतःची ओळख (शिक्षण, व्यवसाय इ०) एकदोन वाक्यांत लिहावी. त्याचप्रमाणे स्वतःचा पत्ता व स्थिरभाषा क्रमांक, चलभाषा क्रमांक व ई-पत्ता द्यावा. (संपादकांच्या सोयीसाठी क्रमांक जरूर कळवावा.)
   (ई) लेखात इंग्रजी अवतरणांचे मराठी भाषांतर द्यावे. व्यक्तिनामे, ग्रंथांची व लेखांची शीर्षके इ० देवनागरीत लिहावीत. (अतिशय अपरिहार्य अशाच ठिकाणी रोमन लिपीचा वापर करावा.)

३. लेखनासंबंधीचा निर्णय एक ते तीन महिन्यांत कळवला जातो. टपाल तिकिटे जोडलेली असतील तर (आणि तरच) नापसंत लिखाण परत पाठवले जाते.

४. लेखनाला अल्प मानधन दिले जाते.

टीकेविना

# भाषेचेच फिक्सिंग

१)

प्र०ना० परांजपे

**फिक्सिंग कोट**

स्पॉट फिक्सिंगच्या प्रकरणाने क्रिकेटची प्रतिष्ठा धुळीला मिळाली. दोषी आढळणाऱ्या खेळाडूंवर कडक कारवाई हवी. या प्रकरणामुळे आता अन्य क्रिकेटपटूंकडेही संशयाने बघितले जाईल.

महेंद्रसिंह धोनी, भारतीय क्रिकेट संघाचा कर्णधार

माझ्याशी कधीही बुकींनी संपर्क साधलेला नाही. अगदी कोणी बुकी माझ्याशी संपर्क साधण्यासाठी आलाच, तर मी त्याला थोबाडीन

हरभजन सिंग, भारताचा फिरकी गोलंदाज

या कोटमध्ये स्पेलिंग हवे!

दै० सकाळ, दि० ६ सप्टेंबर २०१० पृ० ११

२)

नवी दिल्ली : राष्ट्रकुल क्रीडा स्पर्धेचे रविवारी जवाहरलाल नेहरू स्टेडियमवर शानदार उद्‌घाटन झाले. 'नॉलेज ऑफ ट्री' अर्थात 'ज्ञानवृक्ष' या संकल्पनेवर आधारित भारतीय गुरू-शिष्य परंपरा दाखवणाऱ्या कार्यक्रमाने उपस्थितांची मने जिंकून घेतली.

नॉलेज ऑफ ट्री की ट्री ऑफ नॉलेज?

दै० सकाळ, दि० ४ ऑक्टोबर २०१० पृ० १

३)

**लसीकरणाबाबत जागृकता**

'युनिसेफ'च्या वतीने सौरऊर्जेवर चालणारे रेफ्रिजरेटर देण्यात येणार आहेत. त्यात लहान मुलांचे आरोग्य उत्तम राहण्यासाठी देण्यात येणाऱ्या लस ठेवण्यासाठी हे रेफ्रिजरेटर देण्यात येणार आहेत. यात पोलिओ, मिझल्स, बीसीजी, टीपी, डीपीडी या लशींचा समावेश आहे. त्यामुळे नागरिकांनी लहान मुलांसाठी लसीकरणाबाबत जागृत राहण्याची गरज आहे, असे उपसंचालक डॉ. टिपरे यांनी सांगितले.

लेखन आणि मुद्रणातील बचत!

दै० सकाळ, दि० २६ ऑगस्ट २०१० टुडे पृ० २

४)

## काश्मिरात फुटीरतावाद्यांचा प्रभाव होणे गरजेचे : शेकटकर

पुणे, ता. २५ : "प्रत्येक काश्मिरी हा भारतविरोधी नाही; फक्त काही जणांमध्येच फुटीरतेची भावना आहे. या व्यक्तींचा प्रभाव जर कमी करता आला, तर काश्मीर प्रश्न सहज सुटेल," असे मत लेफ्टनंट जनरल (निवृत्त) द. बा. शेकटकर यांनी मंगळवारी व्यक्त केले.

प्रभाव = पराभव

दै० सकाळ, दि० २६ ऑगस्ट २०१० पृ० ९

५)

## महाराष्ट्र ग्रासतोय साथीच्या आजारांनी

राज्यामध्ये गॅस्ट्रो, कॉलरा, अतिसार, हगवण इत्यादी जलजन्य आजारांची तीन वर्षांपासून वीस लाखांपेक्षा अधिक जणांना लागण झाली. त्यात आतापर्यंत अडीचशे जणांचा मृत्यू झाला आहे.

.... पान ८

कोण कुणाला ग्रासतोय?

दै० सकाळ, दि० २५ ऑगस्ट २०१० पृ० १



# हिपटुल्ला

**सआदत हसन मंटो**

''श्यामनं या पत्रात 'हिपटुल्ला' असा एक शब्दप्रयोग वापरला आहे. त्याचा अर्थ स्पष्ट करणं मनोरंजक आहे.''

मी बॉम्बे टॉकीजमध्ये नोकरीला होतो. त्या दिवसांत कमाल अमरोहीच्या 'हवेली' या चित्रपटकथेविषयी बोलणं सुरू होतं. (या कथेवरील चित्रपट 'महल' या नावानं नंतर प्रदर्शित झाला...)

सर्वसाधारण गप्पागोष्टीत वाङ्मयीन शब्दप्रयोग करण्याची कमाल अमरोहीला सवय आहे. माझ्यासाठी ते एक संकट असायचं...

एक दिवस सकाळी घरून बॉम्बे टॉकीजला निघालो तेव्हा ट्रेनमध्ये वर्तमानपत्रातील खेळाची बातमी देणारं पान उघडलं. ब्रेबॉर्न स्टेडियमवर क्रिकेटचा सामना सुरू होता. एका खेळाडूचं नाव फार विचित्र होतं : हिपटुल्ला - एचइपीटीयुएलएलएएचए हे नाव विचित्र का? याचा विचार करू लागलो. पण माझ्या डोक्यात प्रकाश पडेना. कदाचित हबेतुल्लाह या नावाचा अपभ्रंश असणार ते नाव असावं.

स्टुडिओत पोहोचलो. कमाल अमरोहीच्या कथेवर बोलणं सुरू झालं. कमालनं आपल्या खास साहित्यिक व प्रभाव पाडणाऱ्या शैलीत एक प्रसंग ऐकवला. अशोकनं (अशोक कुमारनं) माझं मत विचारलं, ''काय मंटो?''

का कोण जाणे, माझ्या तोंडून शब्द बाहेर पडले,

''ठीक आहे. पण हिपटुल्ला नाही!''

शेवटी जे काही सांगायचं होतं ते सांगून झालं. 'हिपटुल्ला' या शब्दप्रयोगातून ते व्यक्त झालं होतं. कथेतील प्रसंगाचा अनुक्रम लक्षात घेतला तर या प्रसंगात फार दम नाही, हे मला सांगायचं होतं.

''काही वर्षांनंतर हसरत (गीतकार हसरत जयपुरी)च्या बाबतीत, त्याचा वेगळ्या प्रकारे उपयोग केला. त्यानं माझं मत विचारलं तेव्हा सांगितलं, ''भाई हसरत काही जमलं नाही... काहीतरी हिपटुल्ला सारखं सादर कर. हिपटुल्ला...''

दुसऱ्यांदा हिपटुल्ला म्हणून सर्वांची प्रतिक्रिया काय झाली ते पाहू लागलो. हा शब्दप्रयोग आता सर्वसामान्य झाला होता. त्यामुळे फारसा विचार न करता मी त्याचा उपयोग करू लागलो. 'हिपटिलेटी' नव्हे तर 'हिपटोलाईज' करायला हवं. इत्यादी





अनुक्रमणिका

इत्यादी. एक दिवस मला अशोकनं विचारलं,

''हिपटुल्लाचा मूळ अर्थ काय आहे? कोणत्या भाषेत हा शब्दप्रयोग आहे?''

अशोकनं मला अर्थ विचारला तेव्हा श्यामदेखील हजर होता. तो जोरजोरात हसू लागला. त्याचं डोकं आकुंचित झालं. त्या क्रिकेटपटूच्या विचित्र नावाकडे मी त्याचं लक्ष वेधलं, तेव्हा तो माझ्याबरोबर ट्रेनमध्ये होता. हसत हसत त्यानं सर्वांना सांगितलं,

''ही मंटोची नवी मंटोगिरी आहे... त्याला काही ना काही नवं करायचं असतं... काही सुचलं नाही म्हणून त्यानं हिपटुल्लाला पकडून चित्रपटसृष्टीत आणलं आहे.''

सांगायचं म्हणजे फारशी ताणातणी न होता हा शब्दप्रयोग मुंबईच्या चित्रपटसृष्टीतील शब्दप्रयोगात रूढ झाला.

(**सआदत हसन मंटो** - दस्तावेज खंड ५मधील 'मुरली की धुन' या प्रसिद्ध अभिनेता श्यामवरील लेखातून. मंटोच्या सर्व लेखनाचे एकूण ५ खंड 'राजकमल प्रकाशन'नं प्रसिद्ध केले आहेत.)

■

प्रेषक : रमेशचंद्र पाटकर
21, शांतिनिकेतन, काशिनाथ धुरु मार्ग
कीर्ती महाविद्यालयासमोर
दादर (प०) मुंबई 400 028

## शब्दार्थाची सांस्कृतिकता

भाषेतील शब्द, अर्थ आणि त्यांची जोडणी (शब्दार्थसंबंध) ही सगळीच एक सांस्कृतिक निर्मिती आहे हे साहित्याचा अनुवाद करताना, विशेषतः परकी भाषेत करताना, तेव्हाच ध्यानात येते. जो मजकूर मराठी भाषकांच्या कानाला गोड वाटेल तो बांगला भाषकाच्या कानाला खरखरीत वाटू शकेल, जो मजकूर मराठीत रोखठोक/आर्जवी वाटेल तो हिंदीत अनुक्रम उद्धट/रोखठोक वाटेल. जर एखाद्या भाषेमध्ये रोखठोक/आर्जवी, औपचारिक/अनौपचारिक अशा वाक्सरणी उपलब्ध असल्या तर त्यांना एक मानसिक परिमाणही असते. उदाहरणार्थ, मजकुरात स्वर, लकार, नासिक्य व्यंजने यांची रेलचेल असली तर तो कोणत्याही भाषेत कानाला गोड लागण्याचा संभव अधिक किंवा कुणाच्या भाषाप्रयोगात छोटी छोटी वाक्ये नेहमीच अधिक असली तर त्या व्यक्तीची विचार धारण करण्याची क्षमता तोकडी असावी किंवा तिला संबोधित व्यक्तीच्या ग्रहणशक्तीचा भरवसा वाटत नसावा असे लक्षात येते.

- डॉ० अशोक रा० केळकर, 'रुजुवात' पृ० २१९





अनुक्रमणिका

दखलयोग्य

# राज्य मराठीचे... इंग्रजी शाळांचे

**प्रकाश परब**

नवीन मराठी शाळांना परवानगी नाकारून आणि शासनमान्य नसलेल्या प्रयोगशील मराठी शाळांना टाळे लावण्याची धमकी देऊन महाराष्ट्र शासनाने सुवर्णमहोत्सवी वर्षांत मराठी भाषिक राज्याच्या स्थापनेसाठी प्राणांची आहुती देणाऱ्या हुतात्म्यांना अभूतपूर्व अशी आदरांजली वाहिली आहे. मराठी शाळांबाबत पारतंत्र्याच्या काळातील ब्रिटिश सरकारलाही लाजवणारे धोरण स्वीकारून राज्य सरकारने साडेदहा कोटी महाराष्ट्रीय जनतेचा अपमान केला आहे.

मराठी शाळांवरील बंदी तात्पुरती असून बृहत् आराखडा तयार झाल्यानंतर मराठी शाळांना परवानगी देण्याचा विचार करू असा खुलासा राज्याचे मुख्यमंत्री आणि शिक्षणमंत्री करीत असले तरी मुळात मागेल त्याला इंग्रजी शाळा व मराठी शाळांच्या परवानगीला स्थगिती हा आगाऊपणा झालाच कसा; हा प्रश्न उरतोच. मागे खुद्द शिक्षणमंत्र्यांनीच मराठी शाळा हे एक ओझे असल्याचे जाहीरपणे म्हटले होते. आता लोकांनाच मराठी शाळा नको आहेत तर शासन दुसरे काय करणार; असा बचावही शासनामार्फत केला जातो. लोकांची मागणी लक्षात घेऊन काही महापालिकांनी मराठी शाळांचे इंग्रजी शाळांत रूपांतर केलेलेही आपण पाहातो. हे काय चालले आहे? आणि याची परिणती कशात होणार आहे? यासाठीच महाराष्ट्र या भाषिक राज्याची स्थापना झाली का? इंग्रजी शाळांची मागणी करणारे कोण लोक आहेत? लोकांना मराठी शाळा खरेच नको असतील तर त्या का नको आहेत, याचा शासनाने कधी विचार केला आहे काय?

मराठी शाळा दोन कारणांसाठी आवश्यक आहेत. एक - मातृभाषेतून शिकण्याचा आपला अधिकार अबाधित ठेवण्यासाठी, आणि दोन - मराठी भाषेचे जतन व संवर्धन करण्यासाठी.

मातृभाषेतून शिक्षण या संकल्पनेला व्यक्तिगत व सामाजिक परिमाणे आहेत. व्यक्तीच्या सर्जनशीलतेचा, तर्कबुद्धीचा जलद व स्वाभाविक विकास तिची जन्मापासून सोबत करणाऱ्या मातृभाषेत जितका होईल तितका तो परभाषेतून होणार नाही. शिक्षण हे जर माणसातील पूर्णत्वाचे प्रकटीकरण असेल तर ते सिद्ध होण्यासाठी मातृभाषेसारखे दुसरे माध्यम नाही. शिक्षणातील आणि एकूणच मानवी जीवनातील मातृभाषेचे हे महत्त्व ओळखून तिला मातृभूमीप्रमाणे व्यक्तिगत, तात्कालिक उपयुक्ततेपलीकडचे मूल्य प्राप्त

झालेले आहे. त्यामुळे मातृभाषेतून शिक्षण हा व्यक्तीचा केवळ विशेषाधिकार न राहता ते एक सामाजिक, सांस्कृतिक दायित्वही बनते. मातृभाषेतून न शिकल्यामुळे व्यक्तिविकासाला मर्यादा तर पडतातच; पण एका अलिखित सामाजिक कराराचा भंगही होतो. महाराष्ट्रात मराठी शाळांतून शिकणे हा एक सामाजिक करार आहे आणि त्याचे पालन सर्वांनीच केले पाहिजे.

मराठी शाळांचा प्रश्न हा केवळ शैक्षणिक प्रश्न नाही. तो सामाजिक, सांस्कृतिक, राजकीय आणि आर्थिक प्रश्नही आहे. १९६० साली महाराष्ट्र राज्याची निर्मिती झाली ती केवळ प्रशासकीय सोय नव्हती तर जगातील प्रमुख २५ भाषांपैकी एक आणि थोर ऐतिहासिक परंपरा असलेल्या मराठी भाषेच्या स्वतंत्र राज्याची स्थापना होती. मराठी ही महाराष्ट्राची राजभाषा आणि लोकभाषा आहे. तिचे जतन आणि संवर्धन करणे हे आपणा सर्वांचेच कर्तव्य आहे आणि तो पार पाडायचे म्हणजे मराठी भाषेचा शक्य तितक्या सर्व व्यवहारांत गुणवत्तापूर्ण वापर करणे. असा वापर करायचा म्हणजे मराठी शिकणे व शिकवणे आलेच. भाषेचा अध्ययन-अध्यापन व्यवहार कोणत्याही भाषेच्या संवर्धनासाठी आवश्यक असतो. भाषेचे पिढ्यांतर्गत संक्रमण कोणत्याही भाषेच्या अस्तित्वाच्या व विकासाच्या केंद्रस्थानी असते असे भाषेचे अभ्यासक सांगतात. एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे भाषेचे संक्रमण करण्यासाठी ती भाषा शिक्षणाचे माध्यम असावी लागते. केवळ एक विषय म्हणून तिचा अभ्यास पुरेसा नाही. भाषेचा अध्ययन-अध्यापन व्यवहार नसेल तर तिच्या अन्य व्यवहारांना उत्तरोत्तर गळती लागते व ते कालान्तराने नष्ट होतात. मराठी नाटक, चित्रपट, साहित्य, पत्रकारिता व अन्य सार्वजनिक व्यवहार हे मराठी शिक्षणावर आणि अधिक नेमकेपणाने बोलायचे तर मराठी शाळांवर अवलंबून आहेत. जणू मराठी शाळा या मराठी भाषेची मुळे आहेत, तीच नष्ट झाली तर मराठी भाषावृक्षाचा वरचा विस्तार हळूहळू मातीला मिळेल. मराठी शाळा वाचवल्या पाहिजेत, वाढवल्या पाहिजेत. कारण त्यांच्यावरच मराठी भाषेचे भवितव्य अवलंबून आहे. म्हणूनच शिक्षणाच्या माध्यमाबाबत तटस्थ राहून मागणी तसा पुरवठा असे धोरण स्वीकारता येणार नाही. मराठी ही महाराष्ट्राची भाषिक, सामाजिक व सांस्कृतिक ओळख आहे. ती अबाधित व वर्धिष्णू ठेवायची असेल तर मराठी शाळांचा प्रश्न युद्धपातळीवर सोडवला गेला पाहिजे. जागतिकीकरणामुळे वाढलेले इंग्रजी भाषेचे प्रस्थ, शिक्षणाचे खासगीकरण, मराठीशी सोयरसुतक नसलेल्या अन्य भाषकांचे राज्यातील वाढते स्थलांतर आणि राजकीय इच्छाशक्तीचा संपूर्ण अभाव यामुळे मराठी भाषेपुढे 'न भूतो' असे आव्हान उभे राहिले आहे. संयुक्त महाराष्ट्राची चळवळ मराठी भाषिक राज्याच्या स्थापनेसाठी होती. आता तेवढीच मोठी चळवळ उभारण्याची गरज आहे ती मराठी राज्य टिकविण्यासाठी. भाषेकडे तटस्थपणे पाहणाऱ्यांना आणि स्वभाषेविषयी कसलाच मूल्यभाव नसणाऱ्यांना ही कदाचित अतिशयोक्ती वाटेल. पण मराठी शाळांची ही लढाई आपण हरलो तर मराठीची अख्खी लढाई आपण हरल्यासारखे आहे. मराठी शाळा हा मराठीचा आत्मा आहे. तो जपला पाहिजे.

मात्र राज्यशासनाने मराठी शाळांना परवानगी न देण्याचे आपले धोरण बदलले तरी मराठी शाळा टिकतील असे समजणे भाबडेपणाचे ठरेल. मराठी शाळांचा लोकाश्रय वाढून त्यांना इंग्रजीप्रमाणे सामाजिक स्वीकृती व प्रतिष्ठा मिळायची असेल तर पन्नास टक्के सक्ती आणि पन्नास टक्के संधी हे धोरण स्वीकारावे लागेल. लोकांना इंग्रजी शाळा का हव्यात? त्यांना इंग्रजीविषयी प्रेम आहे म्हणून? मुळीच नाही. भाषा अस्मितेवर जगत नाहीत. त्या लोकांच्या पोटावर जगतात. इंग्रजी ही पोटापाण्याची, अर्थार्जनाची, सुखसमृद्धीची भाषा आहे. मराठी भाषेने याबाबतीत उपयुक्ततेचा नीचांक गाठलेला आहे आणि म्हणून लोक असहायतेपोटी इंग्रजीकडे वळत आहेत. मराठीचा अभिमान बाळगणाऱ्यांची मुलेही इंग्रजी माध्यमात शिकतात हा विरोधाभास त्यातूनच निर्माण झालेला आहे. पण मराठी शाळांवर ही पाळी कोणी आणली? साठ-सत्तरच्या दशकात प्रगतिपथावर असलेल्या मराठी शाळांना आताच का घरघर लागावी? गेल्या दोन दशकांत असे काय घडले म्हणून लोकांचा मराठी शाळांवरचा विश्वास उडाला? या काळात मराठी भाषेचे आर्थिक सक्षमीकरण करण्यासाठी राज्य शासनाने कोणती सकारात्मक पावले उचलली? मराठीचे व्यावहारिक कुपोषण करून जगण्यासाठी एक निरुपयोगी भाषा अशी तिची प्रतिमा कोणी निर्माण केली?

मराठी माणूस मराठी शाळांपासून खुशीने दूर गेलेला नाही, तर राज्यशासनाच्या नाकर्तेपणामुळे मराठीचे काही खरे नाही अशी हाय खाऊन त्याने इंग्रजी शाळांचा रस्ता धरलेला आहे. केवळ उच्चभ्रूच नव्हे तर तळागाळातील लोकांनीही आपल्या सामाजिक आणि आर्थिक अभ्युदयाची भाषा म्हणून इंग्रजीचा स्वीकार केला आहे. मुंबईसारख्या शहरांमध्ये हे प्रमाण इतके वाढले की मराठीवरील प्रेमापोटी मुलांना मराठी शाळांत पाठवणारे पालक मागासलेले व वेडे ठरू लागले! अशी परिस्थिती केवळ आपल्याकडेच आहे असे नसून भारतातील इतर प्रांतांत विशेषतः मागासलेल्या राज्यांतही आढळते. मध्यंतरी राहुल गांधी उत्तर प्रदेशच्या दौऱ्यावर असताना एका खेड्यात उतरले. एका पददलित लेकुरवाळ्या महिलेची विचारपूस करताना मुले कोणत्या माध्यमात शिकतात म्हणून सहज विचारले. ती म्हणाली, ''इंग्रजीत''. राहुल गांधींनी आश्चर्याने विचारले, ''इंग्रजीतच का हिंदीतून का नाही?'' त्यावर या महिलेने जे उत्तर दिले ते भारतातील प्रादेशिक भाषांच्या अवनतीचे व इंग्रजीच्या वाढत्या प्रभावाचे मर्म सांगणारे आहे. ती महिला म्हणाली ''तुम्ही लोक चॉकलेटच्या वेष्टनावरही इंग्रजीन लिहिणार मग आमच्या मुलांनी हिंदीत शिकून करायचे काय?'' पोटा-पाण्याचे व्यवहार ज्या भाषेत होत नाहीत ती भाषा कोण आणि कशासाठी शिकणार?

मराठी शाळा वाचवायच्या असतील तर शाळांवर इलाज करून चालणार नाही; त्यासाठी व्यवहारातील मराठीवर इलाज करावा लागेल. मराठी भाषेचे व्यावहारिक, आर्थिक सक्षमीकरण करावे लागेल. म्हणजे प्रशासनाप्रमाणेच राज्यांतर्गत उद्योग, वाणिज्य, विज्ञान, तंत्रज्ञान, उच्च व व्यावसायिक शिक्षण, न्यायालयीन व्यवहार यात

मराठीचा जास्तीत जास्त वापर करावा लागेल. त्यासाठी सक्तीचा मार्ग अवलंबिण्यात काहीही गैर नाही. पण आपल्याकडे मराठीच्या बाजूने कायदे असूनही त्यांची अंमलबजावणी होत नाही. राज्यातील विद्यापीठांनी मराठीतूनही उच्च शिक्षण उपलब्ध करून द्यावे, असे विद्यापीठ कायदा सांगतो; पण प्रत्यक्षात विद्यापीठांनी इंग्रजीच्या वर्चस्ववादाला खतपाणी घातले. राज्यातील सर्व कनिष्ठ न्यायालयातील न्यायनिवाड्यांसह संपूर्ण कामकाज इंग्रजीऐवजी मराठीतून करावे असा राज्य शासनाचा व उच्च न्यायालयाचा आदेश आहे. पण तो संबंधितांनी धाब्यावर बसवला. राज्यातील केंद्रीय आस्थापनांनी आपल्या कामकाजात त्रिभाषा सूत्रानुसार मराठीचा वापर करावा अशी तरतूद असताना लिपीसाधर्म्याचा फायदा घेऊन केवळ इंग्रजी-हिंदीचा वापर करून मराठीची फसवणूक केली. मराठीच्या या व इतर व्यावहारिक अवमूल्यनामुळे लोकांची अशी समजूत झाली की, यापुढे इंग्रजी हीच व्यवहारभाषा असणार आहे. आपल्या राज्याला कसले भाषाधोरण नसल्याचा हा पुरावा आहे आणि आता तर लोकांनाच मराठीऐवजी इंग्रजी शाळा हव्या आहेत; असे सांगून राज्यकर्ते स्वतःच्या पापाचे खापर लोकांच्याच डोक्यावर फोडत आहेत.

■

दै० लोकसत्ता, दि० २२ नोव्हेंबर २०१०

### संदर्भ कसे द्यावेत?

संदर्भ देण्याची नवी, सोयीस्कर व जागेचा अपव्यय टाळणारी पद्धत पुढे दिली आहे. या पद्धतीचाच आपल्या लेखात उपयोग करावा : लेखात ज्या ठिकाणी संदर्भ द्यावयाचा असेल तेथे कंसामध्ये संबंधित पुस्तक-लेखकाचे नाव द्यावे आणि त्यापुढे संदर्भित पुस्तक / लेखाचे प्रकाशनवर्ष द्यावे. त्यानंतर, आवश्यक असल्यास, स्वल्पविराम देऊन पृष्ठक्रमांक लिहावा व कंस पुरा करावा. लिखाणाच्या अखेरीस 'संदर्भसूची' मध्ये संदर्भातील सर्व तपशील द्यावेत. सूचीतील प्रत्येक नोंदीतील तपशीलांचा क्रम साधारणपणे असा ठेवावा : लेखकाचे आडनाव, स्वल्पविराम, नावांची आद्याक्षरे, प्रकाशनवर्ष, ग्रंथाचे शीर्षक, पूर्णविराम, प्रकाशनसंस्था, स्वल्पविराम, प्रकाशनस्थळ, पूर्णविराम. संदर्भसूची मराठीच्या वर्णक्रमानुसार असावी.





अनुक्रमणिका

# अभ्यासकांसाठी मोलाचे भाषांतर

**म०के० ढवळीकर**

(परीक्षित पुस्तक : भारतीय लेखविद्या, दिनेशचंद्र सरकार. मराठी भाषांतर : डॉ० शोभना गोखले. कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे. पृ० ४७८ + चित्रे. किंमत दिलेली नाही.)

प्रा० (कै०) दिनेशचंद्र सरकार हे जगविख्यात भारतीय पुरालिपी तज्ज्ञ होते. ते निष्णात संस्कृत पंडितही होते. काही काळ ते कोलकाता विद्यापीठात प्राचीन भारतीय इतिहास आणि संस्कृती या विषयाचे प्राध्यापक होते. नंतर त्यांनी अनेक वर्षे भारत सरकारच्या पुरातत्त्व खात्यात प्रमुख लिपितज्ज्ञ म्हणून काम केले. 'पिग्राफिया इंद्रिकाए' हे त्या खात्याचे मुखपत्र, त्याचे ते संपादक होते. त्याच्या प्रत्येक अंकात बहुसंख्य लेख डॉ० सरकारांचे असत. त्यामुळे काही विद्वान त्याला 'एपिग्राफिया सरकारीका' म्हणत असत.) डॉ० सरकार यांनी आपल्या हयातीत शेकडो कोरीव लेख प्रसिद्ध केले; त्यातील पुराव्यांच्या आधारे प्राचीन भारतीय इतिहासावर प्रकाश टाकणारे लेख लिहिले आणि अनेक ग्रंथही प्रसिद्ध केले. केंद्रसरकारच्या सेवेतून निवृत्त झाल्यावर त्यांना कोलकाता विद्यापीठाने पुन्हा प्राध्यापक नेमले. प्राचीन लेखांच्या अभ्यासकांत ते अग्रगण्य होते. त्यांनी लिहिलेले ग्रंथ जगातील अनेक विद्यापीठांत अभ्यासासाठी नेमले आहेत. त्यांपैकी एक अत्यंत महत्त्वाचा म्हणजे 'इंडियन एपिग्राफी' त्याचे मराठी भाषांतर डॉ० शोभना गोखले यांनी केले आहे. प्राचीन भारतीय इतिहास आणि संस्कृतीच्या मराठी भाषिक अभ्यासकांसाठी हे भाषांतर अत्यंत मोलाचे ठरेल यात शंका नाही.

डॉ० सरकार हे स्वतः शिक्षक असल्यामुळे ग्रंथाची रचना त्यांनी विद्यार्थ्यांच्या सोयीची केली आहे. एकूण आठ प्रकरणांपैकी पहिल्यात भारतीय पुराभिलेखांचे स्वरूप, इतिहासाची जुळणी करण्याकरता त्यांचा होणारा उपयोग, याची चर्चा केली आहे. या प्रकरणाच्या परिशिष्टात हिंदु-मुस्लिम पुराभिलेखांचीही माहिती आहे. दुसऱ्या प्रकरणात लेखांच्या आर्य आणि द्राविडी भाषांचे वर्णन आहे. प्रथम प्राकृत, नंतर संस्कृत आणि पुढे सहाव्या शतकापासून प्रादेशिक भाषांत लेख लिहिण्यास सुरुवात झाली. लेखनासाठी भूर्जपत्रापासून ताम्रपटापर्यंत लेखनसाहित्य कसे वापरले जात असे हे तिसऱ्या प्रकरणात विशद केले आहे. चौथ्या प्रकरणात लेखनाची चर्चा आहे. यापुढील प्रकरण (पाचवे) अत्यंत महत्त्वाचे आहे. त्यात ताम्रशासनांसंबंधी माहिती आहे. ताम्रशासनाचे प्रकार, त्यांचे स्वरूप, त्यांतील मजकूर - विशेषतः सुरुवातीचा आणि शेवटचा - त्यावरील राजमुद्रा यांचे तपशीलवार वर्णन आहे.





अनुक्रमणिका

या ग्रंथाचे एक महत्त्वाचे वैशिष्ट्य हे की, त्यात परदेशातील भारतीय अभिलेखांचीही माहिती दिली आहे. प्राचीन काळी धर्मप्रसारासाठी आणि व्यापारासाठी भारतीय मोठ्या संख्येने भारताबाहेर अनेक ठिकाणी गेले. आग्नेय आशियात तर त्यांनी आपल्या वसाहती स्थापन केल्या. तेथील लोकांना त्यांनी धर्म, भाषा, लिपी, कला दिल्या. त्यांना संस्कृती दिली. त्याचे अवशेष आजही शिल्लक आहेत. भारतीयांनी तेथे राज्य स्थापन केले. शेकडो संस्कृत लेख आजही तेथे उपलब्ध आहेत. त्यांची माहिती सहाव्या प्रकरणात आहे.

प्राचीन लेखांची कालनिश्चिती हे अत्यंत जिकिरीचे काम असते. त्यात निरनिराळ्या कालगणनांचा उल्लेख असतो. आजही आपण शक आणि संवत यांची गल्लत करतो. अनेक राजांनी शककर्ता बनून आपल्या राज्यरोहणापासून आपल्या नावाने शक सुरू केले. त्या सर्वांची माहिती सातव्या प्रकरणात मिळते. शेवटच्या (आठव्या) प्रकरणात पारिभाषिक शब्दप्रयोग दिले आहेत. ग्रंथाच्या शेवटी महत्त्वाच्या कोरीव लेखांची व राजमुद्रांची चित्रे आहेत. त्यामुळे ग्रंथ परिपूर्ण झाला आहे.

भारतात प्राचीन कोरीव लेख हजारोंनी उपलब्ध आहेत आणि दरवर्षी नव्याने शेकडो सापडतात. त्या सर्वांचे परिशीलन करून त्यावर ग्रंथ लिहिणे हे केवळ प्रा० सरकारच करू शकले. या विषयावरचे इतरांचे काही थोडे ग्रंथ उपलब्ध आहेत; परंतु प्रस्तुत ग्रंथाच्या तुलनेत ते तोकडे वाटतात. तेव्हा हा उत्कृष्ट आणि अत्यंत उपयोगी ग्रंथ लिहिल्याबद्दल या विषयाचे अभ्यासक प्रा० सरकारांचे ऋणी आहेत.

प्रा० सरकार यांच्यासारख्या प्रकाण्डपण्डिताच्या ग्रंथातील उणिवा काढणे धाडसाचे ठरेल. परंतु काही शंका निर्माण होतात. उदाहरणार्थ, सातवाहन आणि क्षहरात यांचे लेख - जे महाराष्ट्रातील लेण्यांत आढळतात– ''मूळ ताम्रपटांवर असलेल्या राज्यशासनाच्या प्रतिकृती आहेत.'' हे विधान पटण्यासारखे नाही (पृ० १०४). एकतर यांपैकी काही लेख खूप मोठे आहेत, ते लिहिण्यासाठी अगणित पत्रे लागले असते; आणि तसे असते तर एखादा तरी पत्रा आजवर सापडला असता. तेव्हा ते प्रथम कापडावर लिहून नंतर कोरक्याला दिले असावेत.

या पाचशे पानांच्या ग्रंथाच्या भाषांतराचे कामही सोपे नव्हते. डॉ० शोभना गोखले हा विषय अनेक वर्षे स्नातकोत्तर विद्यार्थ्यांना शिकवत होत्या. त्यांनी भाषांतर सुबोध केले आहे. परंतु एकदोन सूचना कराव्याशा वाटतात. 'डेटिंग'ला 'दिनांक' ऐवजी 'कालोल्लेख' हा शब्द अधिक योग्य वाटतो. 'फलक' (पृ० १३२) म्हणजे तांब्याचा पत्रा नसून लाकडी फळी असावी. तसेच काही ठिकाणी 'नीट सांगितले नाही' अशा शब्दप्रयोगाऐवजी 'स्पष्ट दिलेले नाही' असे भाषांतर अधिक योग्य वाटते. परंतु एकूण भाषांतर उत्कृष्ट व वाचनीय झाले आहे, यात शंका नाही.



33 नवकेतन सोसायटी, कोथरूड, पुणे 411 029
स्थिरभाष : (020) 2543 3056

# मराठी कोशवाङ्मयातील मौलिक भर

कलिका मेहता

(परीक्षित पुस्तक : भूगोल कोश, लेखक : एल०के० कुलकर्णी. प्रकाशक : राजहंस प्रकाशन, पुणे. पहिली आवृत्ती २००९, पृष्ठे २३ + ३४८ किंमत ₹ ४००)

ज्ञानभाषा म्हणवून घेण्यासाठी केवळ इंग्रजी हीच योग्य भाषा आहे अशी ओरड करणाऱ्यांना एल०के० कुलकर्णी यांचा भूगोलकोश हे सणसणीत उत्तर आहे. वर्षभरात निघालेल्या दोन आवृत्त्या ही भूगोलकोशाच्या यशाची वाचकांनी दिलेली पावतीच आहे.

लेखक स्वत: पुरस्कारप्राप्त आदर्श शिक्षक असून त्यांनी जवळजवळ २५ वर्षे भूगोलाचे अध्यापन केले आहे. त्यामुळेच शालेय स्तरापासूनच उपेक्षित राहिलेल्या या विषयाच्या अध्ययन-अध्यापनातील नेमक्या अडचणी त्यांच्या लक्षात आल्या. त्यांच्या लेखी भूगोल हा सामाजिक शास्त्रांमधील केवळ ४० गुणांइतकेच महत्त्व असणारा विषय नसून जीवनाच्या प्रत्येक अंगाला व्यापून टाकणारी संकल्पना आहे.

भूशास्त्र, हवामानशास्त्र, खगोलशास्त्र, रसायनशास्त्र, भौतिकशास्त्र, जीवशास्त्र इ० विज्ञानशाखांमधील माहिती व संकल्पनांना भूगोलात अनन्यसाधारण महत्त्व आहे पण त्याबद्दलची जास्तीत जास्त अचूक व परिपूर्ण शास्त्रीय माहिती एकत्रितपणे देणारा असा एकही संदर्भग्रंथ मराठीत तर नाहीच पण इंग्रजीतही नाही. वरील विषयांच्या संदर्भग्रंथातूनच त्याविषयी माहिती मिळवावी लागते.

या समस्येवर उत्तर शोधण्याच्या तळमळीतून आणि आपल्या व्यवसायाबद्दलच्या व विषयाबद्दलच्या निष्ठेतून अध्यापक, विद्यार्थी आणि आजूबाजूच्या घडामोडींकडे कुतूहलपूर्ण नजरेने पाहणारा सामान्य माणूस अशा विस्तृत वाचकवर्गाच्या गरजा एकाच वेळी पुरवणाऱ्या दर्जेदार कोशाची निर्मिती झाली. मराठी भाषेच्या कोशदालनात अत्यंत मौलिक अशी भर पडली व भूगोल हा एक विषय न राहता विज्ञान बनले. या कोशनिर्मितीचे वेगळेपण म्हणजे हे वेळखाऊ, खर्चिक काम लेखकाने ११ वर्षांच्या दीर्घ कालावधीत एकट्याने, एकाहाती पूर्ण केले आहे.

या कोशात ३५० भौगोलिक नोंदींचे (त्यांचा उल्लेख लेखकाने 'संबोध' असा केला आहे.) स्पष्टीकरण व माहिती दिली आहे. हे संबोध खगोलशास्त्र, भूशास्त्र, भौतिकशास्त्र, हवामानशास्त्र, पाषाणशास्त्र, सागरशास्त्र, भूकंपशास्त्र, जग व भारतातील विविध स्थळे, पर्वत, नद्या, सरोवरे इ०विषयी आहेत. मनोगत, भूमिका, ऋणनिर्देश व कोशवापरासाठीच्या उपयुक्त सूचनानंतर येणाऱ्या अनुक्रमणिकेत सर्व संबोधांची यादी वर्णानुक्रमे दिली आहे. संबोधांची ही यादी पाहिली तरीही कोशातील विषयांचा आवाका

लक्षात येतो. यात पाऊस, वारे, ढग अशा रोजच्या विषयांपासून भूकंप, त्सुनामी, चक्रीवादळ अशा अस्मानी आणि ओझोनचा थर, जल व मृदा संधारण, भूतापवृद्धी, प्रदूषण अशा मानवनिर्मित संकटांचा ऊहापोह केला आहे. पण त्यात फक्त भौगोलिक बाबी नसून अमेरिका खंडाच्या अंतर्भागाचा शोध घेणारा अमेरिगो व्हेस्पुसी, नकाशातज्ज्ञ गेरहार्ट मर्केटर, मार्को पोलो, शेर्पा तेनसिंग अशा संशोधकांच्या विक्रमवीरांच्या नोंदी आहेत. एखाद्या विशिष्ट नदीची माहिती देताना सोबतच्या चौकटीत तिचा उगम, लांबी, खोऱ्याचं क्षेत्रफळ, मुख, तिच्या उपनद्या इतकेच नव्हे तर तिच्या काठावरची महत्त्वाची तीर्थक्षेत्रे व शहरे ही माहितीही दिली आहे. अगदी गंगा नदीच्या शुद्धीकरण योजनेबद्दलही एक स्वतंत्र नोंद केली आहे. ग्रहांच्या माहितीबरोबर त्यांची सूर्यापासूनची सरासरी, कमाल व किमान अशी तीनही अंतरे दिली आहेत.

हा कोश परिणामकारक तर आहेच परंतु त्यातील चित्रांमुळे तो रंजकही झाला आहे. गंगोत्री, कैलास पर्वत, सर्वांत उंच शिखर के-टू, एव्हरेस्ट, गिरसप्पा धबधबा या भारतातल्या प्रसिद्ध स्थळांबरोबरच चीनची भिंत, ग्रँड कॅनियन अशा सर्वसामान्यांचे आकर्षण ठरलेल्या ठिकाणांचीही चित्रे यात आहेत. माहिती सर्वप्रकारे कळावी म्हणून ज्वालामुखी, धुमकेतू तारकाविश्व, ग्रहांचे मोठे उपग्रह इ० चित्रेही आहेत. काही संकल्पना उदा० गटपर्वत, खारे-मतलई वारे, गारांची निर्मितिप्रक्रिया आकृत्यांमधून स्पष्ट केल्या आहेत. कोशाचा विषयच भूगोल असल्यामुळे नकाशे हा अविभाज्य भाग तर आहेच.

लेखकाने आपली भूमिका स्पष्ट करताना सांगितल्याप्रमाणे सर्वसामान्य वाचक डोळ्यांसमोर असल्याकारणाने सुबोध, साध्या-सोप्या, सुटसुटीत पण नेमका अर्थ व्यक्त करणाऱ्या भाषेचा निकष परिभाषा बनवतानाही लावला आहे. फक्त परिभाषाच नव्हे तर माहिती देतानाही केवळ बुद्धिमत्तेचे व व्यासंगाचे प्रदर्शन न करता कोशाचा उपयोग करणाऱ्याची आकलनक्षमता लक्षात घेतली आहे. त्यामुळे कोशाची वाचनीयता वाढली आहे. हे या कोशाचे बलस्थान आहे. संबोधानंतर शब्दार्थ व टिपा हा विभाग असून त्यामध्ये कोशातील विवेचनात आलेले असे अनेक शब्द आहेत की ज्यांचा अर्थ वाचकाला समजणे आवश्यक आहे. उदा० अल्पाईन वनस्पती, बर्फ, पिग्मी, सुंद्री, सूचिपर्णी इ० ह्या शब्दांच्या बरोबरीने एडमंड हिलरी, शीतल महाजन अशा धाडसी वीरांचीही माहिती दिली आहे.

या माहितीनंतर एकूण ८ परिशिष्टे असून त्यामध्ये आंतरराष्ट्रीय प्रमाण एकके व व्यावहारिक एकके, मोजमापे, रूपांतरणे, उपग्रहांची खगोलशास्त्रीय माहिती, धूमकेतू व उल्कावर्षाव, तेजस्वी तारे, जगातील समुद्र, जगातील देश, त्यांच्या राजधान्या, जागतिक आश्चर्ये इ० अत्यंत उपयुक्त व म्हटले तर वाचकाच्या सामान्यज्ञानाची चाचणी घेणारी पण सहसा कुठेही उपलब्ध नसणारी अशी माहिती देण्यात आली आहे. सहाव्या व सातव्या परिशिष्टात प्रत्येक सामान्य नागरिकाला माहीत असायलाच हवी अशी भारताची माहिती एकत्रितपणे दिली आहे. त्यात नद्यांच्या खोऱ्यांतील प्रकल्पांबरोबरच राज्ये, संघराज्ये

त्यांचे क्षेत्रफळ, लोकसंख्या, राजधान्या, जिल्हे, अभयारण्ये, राष्ट्रीय उद्याने यांचाही समावेश आहे. शेवटच्या परिशिष्टात भूगोल व खगोलशास्त्राच्या संदर्भातील महत्त्वपूर्ण घटनांचा कालपट वाचकांसमोर उलगडला आहे.

त्यानंतर इंग्रजी शब्दांना मराठीत रूढ असलेले द्वीपकल्प, भूशिर यांसारखे वा नव्याने घडवलेले तारकाविश्वासारखे (गॅलक्सी) पारिभाषिक शब्द दिले आहेत. सर्वांत शेवटी इंग्रजी व मराठी संदर्भग्रंथांची यादी आहे.

एकूणच या प्रचंड माहितीसंकलनाला लेखकाने जरी भूगोलकोश म्हटले असले तरी त्याचे स्वरूप ज्ञानकोशाच्या धर्तीचे आहे. ज्ञानकोशाचा आकार महत्त्वाचा नसून त्यामध्ये समाविष्ट ज्ञानाची व्याप्ती पाहिली जाते. ज्ञानकोशाच्या व्याख्येनुसार ज्ञानकोश हा जगाचे यथार्थ, आहे तसे दर्शन घडवणारा जणू आरसाच असतो. चित्रे, नकाशे, आकृत्या, तक्ते, संख्याशास्त्रीय कोष्टके यांची मदत घेऊन त्या त्या बाबीबद्दलची उपलब्ध असलेली सर्व गाभाभूत माहिती सुव्यवस्थितपणे मांडून वाचकांसमोर ठेवणे व त्यायोगे मानवजातीच्या विकासाच्या दिशेने पाऊले उचलणे; हे त्याचे व्यवच्छेदक लक्षण असते.

हा कोश विद्यार्थ्यांना व जिज्ञासूंना भूगोलाच्या अभ्यासाची गोडी लावेल. भूगोलाच्या अभ्यासासाठी अनुकूल वातावरण निर्माण करण्याच्या दृष्टीने उचललेले हे पहिले पाऊलच आहे असे समजायला हरकत नाही. विद्यार्थी, भूगोल अभ्यासक यांच्या बरोबरीन सवर्ससामान्य रसिक वाचकाने संग्रही ठेवावा असा हा भूगोल कोश आहे.

■

सी-7 सूर्यप्रकाश अपार्टमेंट्स, मार्केट यार्ड रस्ता, पुणे 411 037
स्थिरभाष : (020) 2421 4848
चलभाष : 098812 50083
ई-पत्ता : kalikamehta311@gmail.com

---

## परीक्षणासाठी आलेली पुस्तके

गोविंदाग्रज शैली - स्वरूप आणि समीक्षा : डॉ० सुरेश भृगुवार. विजय प्रकाशन, नागपूर. प्रकाशनवर्ष २०१०. पृष्ठे २२९ किंमत ₹ २५०/-

ओळख पक्षिशास्त्राची : डॉ० उमेश करंबेळकर. राजहंस प्रकाशन, पुणे. जून २००९. पृष्ठे १६२ किंमत ₹ १५०/-

---





अनुक्रमणिका

# संयुक्त क्रियापदांचा पेच

चिन्मय धारुरकर

'भाषा आणि जीवन'च्या वर्ष २८, अंक १ हिवाळा २०१० या अंकात रेणुका ओझरकर यांचा ''मराठीतील 'विवाद्य' संयुक्त क्रियापदे'' या शीर्षकाचा लेख आला आहे. या लेखात त्यांनी उमाकांत कामतांच्या एका लेखाचा उत्तम समाचार घेतला आहे आणि मुद्देसूदपणे कामतांच्या म्हणण्याचे खंडन केले आहे.

संयुक्त क्रियापदांची विवाद्यता ही भाषागत नसून सैद्धान्तिक अव्यवस्थेतून निपजते हे रेणुका ओझरकरांचे म्हणणे त्यांच्या संशोधनातील सैद्धान्तिक चौकटीबद्दलची जाण दाखवणारेच आहे.

अर्जुनवाडकरांनी (१९८७:१७८-१८४) केलेल्या संयुक्त क्रियापदांच्या ऊहापोहाचा संदर्भ लेखात नसावा हे मात्र खटकते. लेखाच्या अखेरीस (पृ० ३७, परिच्छेद दुसरा) एका ठिकाणी 'उडी मारणे' व 'गाडी चालवणे' याबद्दल जे लिहिले आहे त्या संबंधातील अडचणीबद्दल पुढे ऊहापोह केला आहे आणि संयुक्त क्रियापदांची व्याकरणातील व्यवस्था यावर चर्चा केली आहे.

'उडी मारणे' यात 'उडी' आणि 'मारणे' यात घनिष्ठ संबंध आहे म्हणजे काय? आणि गाडी चालवणे यात नाही म्हणजे काय? याचे एक स्पष्टीकरण असू शकते की, उडी आणि मारणे यांच्या विभिन्न / वेगवेगळ्या स्वत:च्या अर्थापासून जो बोध होतो तो त्यांच्या संयोगाने होत नाही तर तिसराच अर्थ व्यक्त होतो. हा तिसरा अर्थ निर्माण करण्याची जी शक्ती उडी मारणे, गप्पा मारणे, मांडी घालणे इ० क्रियापदांत असते त्या असण्याला आपण घनिष्ठ संबंध म्हणत आहोत. गाडी चालवणे यातील गाडीचा अर्थ आणि चालवणे याचा अर्थ बघता मिळून काही अगदी वेगळाच अर्थ निघत नाही तर ''गाडी चालवणे'' हाच निघतो. अर्थाच्या पातळीवरील हे तथ्य नजरेसमोर ठेवून आपण घनिष्ठ संबंध असे म्हणणार असलो तर यातून काही व्यवस्था हाती लागत नाही, कारण मुळात वेगळा अर्थ निघतो म्हणून ही संयुक्त क्रियापदं असं म्हणण्यात काही फार तथ्य नाही, कारण भाषेत वेगळा अर्थ संदर्भाने कथित संयुक्त नसणाऱ्या क्रियापदाचाही निघू शकतो. अर्जुनवाडकरांनी केलेली चर्चा पाहा : अर्जुनवाडकर (१९८७:१८०)

संयुक्त मानल्या गेलेल्या क्रियापदांना आपण जर गोठलेल्या रचना (फ्रोजन एक्स्प्रेशन्ज!) किंवा रूढीभूत रचना म्हणणार असलो तर अर्थविचार आणि व्याकरण यांना एकत्र आणत आहोत. तसे करताना बरीच सावधगिरी बाळगावी लागेल. मुळात संस्कृत

आणि इंग्रजीच्या प्रभावात विकसित झालेली आपली मराठीची 'अमराठी व्याकरणं' इथे फसली आहेत. व्याकरण म्हणजे रूपांच्या निर्मितीचे नियमन करणारे शास्त्र अशी ढोबळ धारणा दिसून येते. ती काही अंशी पाणिनीय प्रभावातून आहे. पाणिनी बऱ्याचदा रूपलक्ष्यी भूमिका घेतो आणि महत्त्वाच्या घटकांना पदगती देण्यात धन्यता मानतो. पाणिनीला अर्थलक्ष्यी विचार (म्हणजेच सिद्ध पदांचे वा त्यांतील घटकीभूत अवयवांचे आर्थिक विश्लेषण) नको होता असं मुळीच नाही तर पद (पद म्हणजे १. तिङन्त म्हणजेच तिङ् इ० प्रत्यय ज्यांच्या अंती आहेत अशी धातुरूपे किंवा २. सुबन्त म्हणजे सूप् इ० प्रत्यय ज्यांच्या अंती लागलेले आहेत अशी नामरूपे व म्हणून भाषेत व्यवहारयोग्य असा शब्द) या संकल्पनेने रूपनिर्मिती, पदसिद्धीला होणारे फायदे (जसे की अव्ययांना सुबन्तत्व दिले की त्यांनाही पदसंज्ञा मिळते व पाणिनीय व्यवस्थेत त्यांसाठी वेगळी शब्दजाती लागत नाही इ०) पाहता, एक औपचारिक बांधिलकी म्हणून रूपलक्ष्यित्व प्राबल्याने दिसते. पाणिनीचा आणि संस्कृताचा उल्लेख झालाच आहे तर कथित 'संयुक्त क्रियापदां'संबंधी पाणिनी काय म्हणतो या साहजिक प्रश्नाचा ऊहापोह करू. पाणिनीच्या व्याकरणातील रूपनिर्मितीच्या आणि पदसिद्धीच्या व्यापारात 'संयुक्त क्रियापद' अशी संकल्पना नाही. तिची मुळात पाणिनीय व्यवस्थेत गरजही नाही. ओझरकरांनी दिलेली 'नमस्करोति' आणि 'प्रकटीकरोति' ही संयुक्त क्रियापदे नाहीत असे म्हणता येणार नाही; परंतु, पाणिनीसाठी ती संयुक्त क्रियापदे नक्कीच नाहीत. 'नमः' व 'प्रकटी' दोहोंनाही रीतसर पदसंज्ञा प्राप्त होते आणि एक अव्ययपद म्हणून त्यांचे स्थान निश्चित होते. संस्कृत भाषा ही अर्थात पाणिनीच्या मालकीची नाही. पाणिनीने केवळ एक व्याकरणिक प्रारूप उभे केले आहे. ओझरकरांना किंवा आधुनिक भाषाविज्ञानाच्या चष्म्यातून बघणाऱ्या कोणालाही जर संस्कृतातील अशा क्रियापदांची संगती 'कॉम्प्लेक्स प्रेडिकेट' म्हणजेच 'संयुक्त क्रियापदे' म्हणून लावायची असेल तर तो मार्ग खुला आहेच. भाषाविज्ञानात कॉम्प्लेक्स प्रेडिकेट्स आणि कम्पाउंड व्हर्ब्ज अशा दोन संज्ञा रूढ आहेत आणि त्या आलटून पालटून वापरल्या जातात. केवळ धातुरूपांचा संयोग असेल तर तिथे कम्पाउंड व्हर्ब (उदा० करत बसणे, उकरून काढणे इ०) ही संज्ञा वापरावी व नाम+धातुरूप (उदा० गप्पा मारणे, उडी मारणे इ०) अशा संयोगांसाठी कॉम्प्लेक्स प्रेडिकेट म्हणावे असा कल आहे, तसेच कॉम्प्लेक्स प्रेडिकेट्स हा मोठा संच मानून कम्पाउंड व्हर्ब्ज हा पोटप्रकार मानावा असाही प्रवाह आहे. या लेखात मात्र नाम +धातुरूप अशा रचनांचीच चर्चा आहे.

पाणिनीय प्रभावातून बाहेर पडून तसेच इंग्रजी व्याकरणाच्या अंधानुकरणातूनही बाहेर पडून आता जायचे कुठे असा प्रश्न आहे. एक उत्तर हे की आधुनिक भाषाविज्ञानात कॉम्प्लेक्स प्रेडिकेट्सची व्यवस्था वेगवेगळ्या सिद्धांतांमध्ये लावण्यात येते ती मराठीला लागू करून बघणे.

आपण काही एक भूमिका घेणार असू तरच हे सुरू करणे योग्य. मुळात संयुक्त क्रियापदे का मानू नयेत याची भरपूर समाधानकारक चर्चा अर्जुनवाडकर करतात. तिची पुनरुक्ती नको. संयुक्त क्रियापदे मानू नयेत यापक्षी भाषावैज्ञानिक विश्लेषणात्मक पुरावा व

कारणमीमांसा अर्जुनवाडकर पुरवतात. हे जरा टोकाचे किंवा फारच रूपलक्ष्यी आहे. पण अर्जुनवाडकरांचे म्हणणे पटण्यासारखेच आहे. त्यामुळे एक भाषाविशेष आपण दुर्लक्षून टाकत आहोत असे वाटू शकते, पण त्याला इलाज नाही. कारण जर अर्थाचा असा विचार आपण व्याकरणात करत बसलो तर आलंकारिकांचे कामही आपण करून ठेवू, मग त्यांनी करायचे काय! असो. गमतीचा भाग बाजूला, पण आपणच उलटी भूमिका भक्कम करता येते का बघू आणि तसे करताना काय अडचणी येतात ते बघू.

संयुक्त क्रियापदे असतात असे मानू. ती लाक्षणिक अर्थाने कळून येतात यावर आपण जरा विचार करू. लाक्षणिक अर्थाने कळून येणे म्हणजे काय हा मूळ प्रश्न आहे तो आपण अर्जुनवाडकरांना विचारू शकतो. त्यावर ते आपले मम्मटाचे पुस्तकच आपल्या समोर ठेवतील. अर्थात ते योग्यच आहे. लक्षणार्थाने कळून येत नाहीत या दिशेने चर्चा पुढे जाऊ शकत नाही.

आधुनिक मनोलक्ष्यी भाषाविज्ञानाच्या अभ्यासपद्धती वापरल्यावर असे दिसून आल्यास नवल नाही की एखादा लाक्षणिक अर्थ मराठीत कळून येण्यास जेवढा (मिलीसेकंदाचा) वेळ लागतो तेवढाच वेळ या 'लक्षणाभिव्यंजक' संयुक्त क्रियापदांचा अर्थबोध होण्यास लागत नसून त्यापेक्षा बराच कमी लागतो. यालाच मुळी भाषाविज्ञानात गोठलेली रूढ (फ्रोझन), अभ्यासाने, सवयीने बांधलेली (फॉर्म्युलैक) अशी विशेषणे वापरली जातात. शिवाय, मराठी भाषक 'गप्पा मारणे' याचा वापर करताना 'चला जरा लक्षणा वापरू या' किंवा 'काय नवलाईनं प्रयोग करतो आपण' असा दरवेळेस विचारही करत नाहीत, हे प्रयोग सवयीने सहज मुखावाटे बाहेर पडतात. म्हणजेच इथे लक्षणा गोठलेली आहे. इथे लक्षणा आहे याचे भानही वापरकर्त्यांना राहिलेले नसते.

असे असले म्हणून, उलटपक्षी कोणी असेही म्हणेल की 'उडी मारणे, गप्पा मारणे' यांत लक्षणा गोठलेली आहे आणि त्यांचा समग्रपणे एकत्रितच अर्थबोध होतो, त्यांतील नामांचा (उडी, गप्पा), क्रियापदांचा यांचा भिन्नत्वाने बोध होत नाही, तर त्यांना संयुक्त मानायचेच कशासाठी. म्हणजे संयुक्त क्रियापदे (नाम+क्रियापद प्रकारातले कॉम्प्लेक्स प्रेडिकेट्स) ही संज्ञाच टाळता येतील. पण असे म्हणणे सयुक्तिक नाही. कारण समग्रपणे जरी बोध होत असला तरी ती, ती नामे आणि क्रियापदे अस्तित्वात असतातच. आणि त्यांचा संयोग इथे होत आहे, म्हणून त्यांना संयुक्त म्हणण्यात वावगे काहीच नाही! पण हा युक्तिवादही फार तग धरू शकत नाही, कारण मूळ प्रश्न हा की गोठलेल्या लक्षणा आपले व्याकरण स्पष्टीकरणाच्या पातळीवर हाताळू शकते का? याचे सरळ उत्तर नाही, असे आहे. कारण सुरुवातीला म्हटल्याप्रमाणे गोठलेल्या लक्षणातील पदांच्या संयोगातून निर्माण होणाऱ्या अर्थाविषयी काही निश्चयपूर्वक भाकीत करता येत नाही. याची जबाबदारी शेवटी कोशावर टाकावी लागते आणि वाक्प्रचार या कोटीतच त्यांची यादी द्यावी लागते.

सोस्यूरच्या चिन्हाच्या यादृच्छिकतेचा विशेष वाक्प्रचारांच्या संदर्भातही लागू ठरतो. गोठलेल्या लक्षणांची वासलात कोशात वाक्प्रचार या खाक्यात करणे म्हणजे एक प्रकारे त्यांची कोणतीही तार्किक मीमांसा न देता त्यांची यादृच्छिकता मान्य करण्यासारखेच आहे.

दुसऱ्या एका दिशेने या गोष्टीचा विचार करता येईल. ती दिशा म्हणजे स्टिव्हन पिंकर यांनी दाखवलेली किंवा एस्पेरांतोच्या विकासातून स्पष्ट झालेली. त्यानुसार असे वाक्प्रचारात्मक प्रयोग निर्माण होणे हे भाषेचे भाषापणच आहे. मग त्या चिन्हभाषा असोत व एस्पेरान्तो सारख्या रचलेल्या भाषा असोत, त्यांना सुरुवातीला कितीही तर्काधिष्ठित अथवा दामटून नियमबद्ध करण्याचा प्रयत्न केला तरी (प्राय: चिन्हाच्या यादृच्छिकतेच्या तत्त्वामुळे) भाषेचा कल अधिकाधिक वाक्प्रचारात्मक होण्याकडेच असतो.

इथे एक तात्त्विक विसंगती जाणवू शकते. ती अशी की आपण गोठलेल्या लक्षणा म्हणण्यासाठी ज्ञानात्मक भाषाविज्ञानाची कास धरत आहोत. आणि संयुक्त क्रियापदे आहेत / असतात असे म्हणताना पारंपरिक व्याकरणात मानल्या जाणाऱ्या पदजातींना ग्राह्य धरत आहोत. त्याचे कारण असे की ज्ञानात्मक व्याकरणे कशी लिहावीत [पाहा लँगॅकर (२००८), राडन आणि दिर्वे (२००७)] मानवी बुद्धिगत भाषिक प्रक्रियांचा व्याकरणगत अनुबंध कसा असावा याची थोडीफार स्पष्टता भाषाविज्ञानात असली तरी संयुक्त क्रियापदांची संगती लावण्यासाठी अखेरीस 'लेक्सिकन' वरच सगळी जबाबदारी टाकली जाते. तसेच, ज्ञानात्मक पातळीवर समग्रपणे बोध होणे वेगळे आणि मनोबाह्य (ज्ञानात्मक नसलेल्या) व्याकरणामध्ये नाम, क्रियापद या भिन्न पदजाती मानणे वेगळे. मूळ तिढा असा की या लक्षणेने कळून येणाऱ्या त्यांची व्यवस्था आपण कोणत्याही प्रकारच्या व्याकरणात लावणार का आणि कशी? सत्तरच्या दशकात चॉम्स्कीच्या 'रिमार्क्स ऑन नॉमिनलायझेशन' या निबंधानंतर लेक्सिकलिझमची लाट आली आणि अशा प्रकारे व्यवस्था न लागणाऱ्या घटकांची व्यवस्था (त्यांचे वाक्यातील वर्तन, त्यांच्यासोबत येऊ शकणारे शक्यतम कारकार्थ इ० तपशील) सरसकट लेक्सिकन (शब्दकोश)मध्ये असते असे सांगितले जाऊ लागले. हे प्रकार वाक्यविचाराने अर्थविचारातून आपले अंग काढून घेण्यातलेच होते.

**संदर्भ :**


अर्जुनवाडकर, कृ० श्री० १९८७. 'मराठी व्याकरण : वाद आणि प्रवाद'. सुलेखा प्रकाशन, पुणे.

ओझरकर, रेणुका. २०१०. 'मराठीतील विवाद्य संयुक्त क्रियापदे'. भाषा आणि जीवन : हिवाळा, अंक १, पृ० ३३-३८

चॉम्स्की, नोम. १९७०. 'रिमार्क्स ऑन नॉमिनलायझेशन' (संपा० आर याकोब्झ आणि पी रोझनबाउम) 'रिडिंग्झ इन इंग्लिश ट्रान्सफॉर्मेशनल ग्रामर' वॉल्टहॅम, मॅसॅचुसेट्स. गिन आणि कं०. पृ० १८४-२२१

राडन, ग्युंटर आणि दिर्वे, रेने. २००७. 'कॉग्निटिव्ह इंग्लिश ग्रामर', जॉन बेंजामिन्झ पब्लिशिंग कंपनी, ॲमस्टर्डॅम.

लँगॅकर. २००८. 'कॉग्निटिव्हर ग्रामर : अ बेसिक इंट्रडक्शन' ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, न्यु यॉर्क.


■

ई-पत्ता : chinmayvijay@gmail.com

# भाषाभिमान आणि भाषाविवेक

**अ०रा० यार्दी**

संदर्भ : 'भाषा आणि जीवन'चा वर्ष २८, अंक ३ पावसाळा २०१०

१) इंग्रजी शब्दांना मराठीत प्रतिशब्द देताना खूपच सूक्ष्म विचार करायला हवा. उदा० टेलिफोनला आपण दूरध्वनी/दूरभाष म्हणतो आणि मोबाईलला भ्रमणभाष/भ्रमणध्वनी म्हणतो. खरे तर टेलिफोनला 'स्थिरभाष' म्हणायला काय हरकत आहे? लँडलाइनचा अर्थ तो घरात. एका ठिकाणी, जागा निश्चित केलेल्या ठिकाणी ठेवलेला असतो. 'भ्रमणभाष' हा शब्द भ्रमण करता करता, बोलता येण्याची सोय असलेला या अर्थाने ठीक आहे. पण तो शब्द ध्वनीपेक्षा वस्तूला अधिक लागू होतो. काही लोक मोबाईलला 'चलभाष' असाही शब्द वापरतात. म्हणजे याच आधाराने टेलिफोनला 'अचलभाष' म्हणायचे काय?

२) ''बहुभाषिक भारत- वास्तव आणि स्वप्न'' हा मॅक्सीन बर्नसन यांचा लेख अतिशय उद्‌बोधक आहे. मुद्दा आहे, 'मुलांना मातृभाषेतून शिक्षण घेऊ द्या' या शिक्षणतज्ज्ञांच्या अभिप्रायाबद्दलचा. वास्तव हे नेहमीच वेगळे राहिले आहे. शिक्षणतज्ज्ञांनी कितीही कंठरवाने सांगितले, तरी मुलांना आपल्या मातृभाषेमध्ये शिक्षण मिळविणे दुरापास्त होत चालले आहे, विशेषतः भाषावार प्रांतरचनेनंतर.

'मातृभाषा' या मागची संकल्पनाच मोडीत काढण्याचे राजकारण आज राज्या-राज्यांमध्ये खेळले जात आहे. मातृभाषा म्हणजे आईची-आईकडून आलेली भाषा. इतर आनुवंशिक गुण (आणि दोष) सुद्धा घेऊनच जसे मूल जन्माला येते, तसेच भाषेचे अंगही ते आईकडून घेऊन येत असावे आणि त्यानंतर ते अधिकाधिक, घडणीच्या बालपणी आईच्या सहवासातच राहत असते. त्यामुळे आईची भाषा ती मातृभाषा असे झाले असावे. पण आजकाल मातृभूमी, मातृभाषा या संकल्पना इतक्या संकुचित मनाच्या लोकांच्या ताब्यात गेल्या आहेत की या सगळ्यांचा पुनर्विचार करावा असे त्यांना वाटू लागले आहे. मातृभूमी म्हणजे भारत देश नसून ज्या प्रांतात तो/ती, जन्मला/जन्मली, ती भूमी होय. मातृभाषा म्हणजे आईकडून आलेली भाषा असे नसून त्या राज्याची भाषा होय, असा समज जरबेने बसवू पाहिला जात आहे. अशा संदर्भात शिक्षणतज्ज्ञांच्या विधानाचा नेमका अर्थ काय घ्यायचा? आणि तो नेमका घेतला, तर त्याला वास्तवात कितपत आधार मिळतो? भाषांचा हा गोंधळच नको म्हणून इंग्रजी किंवा हिंदी भाषांच्या माध्यमांच्या शाळांत आपल्या पाल्यांना पाठविणारे पालक आज संख्येने वाढत आहेत आणि विशेष म्हणजे अशी आपली मातृभाषा सोडून इतर भाषांतून शिक्षण घेतलेली मंडळी मातृभाषांत

शिक्षण घेतलेल्या मुलांच्या तुलनेत खूपच उजवी ठरत आहेत. 'तडफदार' ठरत आहेत. मातृभाषांत शिक्षण घेतलेली मुलं मात्र न्यूनगंडानं त्रस्त झालेली दिसत आहेत. असे सगळे असताना मातृभाषेतल्या शिक्षणाचा आग्रह कशासाठी? इतर भाषांत शिक्षण घेतलेल्या मुलांनी परदेशवाऱ्या करायच्या, ऐषारामी जीवन जगायचं आणि मातृभाषेत शिक्षण घेतलेल्यांनी फक्त आपल्याच राज्यापुरतं मर्यादित जगायचं? या सगळ्या गोष्टींचा गंभीरपणे विचार करून त्यावर योग्य ती उपाययोजना होत नाही, तोपर्यंत 'मातृभाषेतून शिक्षण' या वैज्ञानिक विचाराला वास्तव जगात आधार मिळणं कठीण आहे.

एक गोष्ट मात्र खरी की, स्व-भाषेच्या अतिरिक्त हव्यासापायी आणि स्वभाषेबद्दलच्या निष्काळजीपणापायी आपण अनेक वेळा सांस्कृतिक हत्या करीत असतो, हे राज्यकर्त्यांच्या गावीही नसते. महाराष्ट्र कर्नाटकाच्या सीमाभागातले उदाहरणच पाहा. सीमावर्ती भाग म्हटलं की द्विभाषिकांची वस्ती असणारच. असे असताना त्या त्या सीमावर्ती भागातल्या संस्कृतीचे संरक्षण करण्यासाठी त्या त्या भाषकांना स्वातंत्र्य दिले पाहिजे. कर्नाटकातल्या मराठी भाषकांना आणि महाराष्ट्रातल्या कन्नड भाषकांना (सीमावर्ती भागातल्या) आपली भाषिक संस्कृती जपून ठेवण्यासाठी, खरे तर स्थानिक शासनांनी मदत केली पाहिजे. अशा सीमावर्ती भागांची तर त्या त्या शासनाने विशेष दखल घेऊन द्वैभाषिक संस्कृती टिकवली पाहिजे. त्यासाठी तीव्र संघर्ष करावा लागूनही पदरी काहीच न पडल्याची निराशाही धोकादायक आहे.

राज्यांच्या सीमावर्ती भागातली संमिश्र संस्कृती, ही केव्हाही त्या त्या राज्याचे भूषण ठरायला हवी. पण चित्र उलटेच आहे. राज्यकर्त्यांच्या अशा असंस्कृत धोरणामुळे भाषिक आणि सांस्कृतिक हत्या होत आहेत.

अमेरिकन प्रोफेसर पॉल ब्रास यांनी भारतातील भाषा-व्यवहाराचा अभ्यास केला आहे. पण ''आपली राहणी सुधारण्यासाठी, सामाजिक प्रतिष्ठा मिळवण्यासाठी मातृभाषेचा त्याग करायला काही हरकत नाही.'' हे त्यांचे मत भावनाशून्य आणि केवळ बुद्धिजीवी लोकांचे प्रतिनिधित्व करणारे आहे. आपल्या मातृभाषेचा त्याग करण्याचा सल्ला जो देतो, त्याला मातृभाषेबद्दलच्या भावना काय कळणार? उपयुक्ततावादापलीकडेही जीवनदृष्टी असू शकते, हे केवळ बुद्धिवाद्यांना कळणारच नाही.

आपण बऱ्याच वेळा परराज्यातल्या विद्वानांना विशेष व्याख्यानांसाठी बोलावीत असतो. शेजारच्या राज्यातील विद्वानांना तरी एकमेकांची भाषा अवगत असायला हवी. पण दुर्दैव असे, की आपल्याच देशबांधवांशी थेट संवाद साधायचा असेल तर, या विद्वानांना इंग्रजीचा आधार द्यावा लागतो. आणि हल्ली 'नॅशनल सेमिनार' या नावाखाली जे देखावे केले जातात त्यात भाग घेणाऱ्या स्थानिक प्राध्यापकांनासुद्धा इंग्रजीत केलेली भाषणे कळत नाहीत. सगळ्यात गंमत म्हणजे, अशा वेळी भाषाभिमान्यांनी इंग्रजीतून बोलण्याचा आग्रह करावा, हे तर न सुटणारे कोडे आहे.

आजचा तरुण-वर्ग परकी भाषा, विशेषत: जपानी. चिनी, जर्मन, फ्रेंच, पोर्तुगीज या भाषा अत्यंत आवडीनं आणि अभिमानानं, त्या त्या देशात मिळू शकणाऱ्या नोकऱ्यांच्या आशेपोटी शिकत आहे. याउलट आपण आपल्याच देशातल्या किती राज्यांच्या भाषा एवढ्या अभिमानानं आणि आवडीनं शिकतो?

## सहेतुक भाषासरणी

भाषा आणि साहित्य ह्यांना जोडणारी संकल्पना म्हणजे 'शैली' (style). शैलीचा आपण प्रथम भाषेच्या अंगाने विचार करू, नंतर साहित्याच्या अंगाने.

'शैली'ची व्याख्या भाषेच्या अंगाने द्यायची तर ती 'सहेतुक भाषासरणी' अशी देता येईल.

समजा, आपल्याला एक खुर्ची बनवायची आहे. ती बनवताना कच्चा माल, पैसा, हत्यारे, वेळ, बळ, कौशल्य इत्यादिकांची आपल्याजवळ जी काय उपलब्धी आहे तिच्या काही मर्यादा आपल्यावर पडतील. तसेच आपल्याला काय उपलब्ध करायचे आहे, काय साधायचे आहे ह्याचीही बंधने आपल्यावर आहेत. इतके वजन पेलायचे आहे, गुरुत्वमध्य इतका खाली आणायचा आहे, खुर्च्या वाहून न्यायला आणि एकावर एक डाळून ठेवायला सोप्या असाव्यात ह्या किंवा अशा अटी आपल्याला पाळायच्या आहेत. प्रत्यक्ष खुर्ची तयार झाल्यावर, तिचे रंगरूप निश्चित झाल्यावर तिच्याकडे पाहिले तर ह्या दोन्ही प्रकारच्या मर्यादा कमीअधिक यशस्वी रीतीने संभाळल्याचे आपल्या ध्यानात येते. मात्र हा मर्यादापालनाचा हिशोब आपण वजा घातला तर खुर्चीच्या निर्मात्याने निवडीचे स्वातंत्र्य उपभोगल्याचे दिसून येते. ही श्रीशिल्लक म्हणजे शैली. (शैलीहीनता आणि कुशैली ह्यांमध्ये रेषा ओढायला हवी.)

उपलब्धी आणि उपयुक्तता ह्यांमधून वेगळी वाट काढून साध्य गाठणे म्हणजे शैली. मग ती शैली त्या व्यक्तीने स्वतंत्र शिल्पिलेली असो किंवा संस्कृतीने उपलब्ध करून दिलेल्या तयार वळणांपैकी एकाचे थोड्याफार फरकाने केलेले अनुकरण असो किंवा विशिष्ट कालखंडात विशिष्ट संस्कृतीने उपलब्ध केलेल्या एकच एक पर्यायाची पृथगात्मता असो.

- डॉ० अशोक रा० केळकर, 'रुजुवात' पृ० २६

# अरुणाचलमध्ये सापडली दुर्मिळ भाषा

अरुणाचल प्रदेशातील एका दुर्गम भागात बोलली जाणारी अज्ञात भाषा शोधून काढली आहे. जेमतेम ८०० जण बोलत असलेली ही भाषा नामशेष होण्याच्या मार्गावर आहे.

'कोरी' असे या भाषेचे नाव आहे. तिबेट व ब्रह्मदेश विभागातील ही भाषा असल्याचे तज्ज्ञांचे मत आहे. या विभागातील ४००पैकी १५० भाषा भारतात बोलल्या जातात. मात्र त्यांपैकी कोणत्याही भाषेशी 'कोरो'चे साम्य नाही. ऑरेगॉनमधील 'लिव्हिंग टंग्ज इन्स्टिट्यूट'मधील ग्रेगरी अँडरसन, पेनसिल्वेनियातील स्वार्थमोअर महाविद्यालयातील डेव्हिड हॅरिसन आणि रांची विद्यापीठातील गणेश मुर्मू यांच्या पथकाने हा शोध लावला आहे. त्यांना 'नॅशनल जिओग्राफिक'ने साहाय्य केले होते. अरुणाचल प्रदेशात जाण्यासाठी या संशोधकांना भारत सरकारची परवानगी घ्यावी लागली. ''कोरो भाषा बोलणाऱ्यांमध्ये ज्येष्ठ लोकांचाच समावेश आहे. २० वर्षांखालील फारच कमी लोक ही भाषा बोलतात,'' असे अँडरसन यांनी सांगितले.

'नॅशनल जिओग्राफिकच्या एंड्युरिंग व्हॉईसेस प्रोजेक्ट'अंतर्गत हे पथक 'आका' आणि 'मिजी' या अत्यंत कमी बोलल्या जाणाऱ्या भाषांच्या शोधात फिरत असताना अचानक त्यांना 'कोरो' भाषेचा शोध लागला. अरुणाचल प्रदेशात डोंगराळ भागात भात-बार्ली पिकविणाऱ्या गावांत जाऊन भाषा ऐकत व त्याचे रेकॉर्डिंग करत असताना त्यांना या भाषेचा शोध लागला. या पथकाने मोहिमेपूर्वीच भाषांचे वैविध्य असलेले अरुणाचल हे जागतिक नकाशावरील केंद्र म्हणून निश्चित केले होते. दहा वर्षांनी जर आम्ही अरुणाचलला आलो असतो, तर या भाषेची माहितीही मिळाली नसती, असे अँडरसन यांनी सांगितले.

अरुणाचलमध्ये सुमारे ५० भाषा बोलल्या जातात. यांपैकी बहुसंख्य भाषांना लिपी नाही. अरुणाचल प्रदेशात गेलेल्या तज्ज्ञांच्या पथकातील एक सदस्य डेव्हिड हॅरिसन यांच्या मते 'कोरो', 'आका' आणि 'मिजी' या प्रत्येक भाषेचे स्वरूप वेगळे आहे. जसा इंग्रजी आणि जपानी भाषेतील उच्चारांत फरक आहे, तशाच प्रकारचा फरक 'आका' आणि 'कोरो' भाषांतील उच्चारात आहे. 'आका' भाषेत पर्वताला 'फू' असे म्हटले जाते, तर 'कोरो' मध्ये 'नाग्गो'. हा फरक फक्त उच्चाराचा नाही, तर व्याकरणाचाही आहे. कोरो भाषेचा उगम तिबेटमध्ये झाला असण्याची शक्यता आहे.

■

दै० सकाळ, दि० ७ ऑक्टोबर २०१०

# मध्य प्रदेशात 'मराठी साहित्य अकादमी'

मराठी भाषेच्या जतन-संवर्धन-विकासासाठी राज्यात 'मराठी साहित्य अकादमी' स्थापन करण्यात यावी, ही मागणी खुद्द महाराष्ट्रात अद्याप दुर्लक्षिली गेली असली, तरी शेजारच्या मध्य प्रदेश सरकारने मराठी भाषेला अधिकृत दर्जा देण्याबरोबरच नुकतीच 'मराठी साहित्य अकादमी'ची स्थापनाही केली आहे. मध्य प्रदेश सरकारच्या सांस्कृतिक विभागाचे सचिव श्रीराम तिवारी यांनी गुरुवारी (९ डिसेंबर) भोपाळ येथे यासंबंधीची अधिकृत घोषणा केली. मध्य प्रदेशमध्ये मराठी भाषा, साहित्य, संस्कृती या क्षेत्रात गेली तीस वर्षे कार्यरत असणारे डॉ० गणेश बागदरे यांची मराठी साहित्य अकादमीचे पहिले संचालक म्हणून नेमणूकही करण्यात आल्याचे तिवारी यांनी घोषित केले.

महाराष्ट्राच्या बाहेर अशा प्रकारची 'मराठी साहित्य अकादमी' सुरू करणारे आणि मराठी भाषेला राज्यात हिंदीनंतरची दुसरी अधिकृत भाषा असा दर्जा देणारे मध्य प्रदेश हे पहिले राज्य ठरले आहे. मध्य प्रदेशमध्ये मराठी भाषकांची संख्या सध्या एक कोटी पंचवीस लाखांच्या आसपास आहे. छत्तीसगडच्या निर्मितीपूर्वी ही संख्या दोन कोटीच्या आसपास होती.

मध्य प्रदेशात भोपाळ, ग्वाल्हेर, जबलपूर आणि इंदूर येथे मराठी भाषकांची संख्या मोठ्या प्रमाणात आहे. पेशव्यांच्या काळात आणि त्याही आधीपासून अनेक मराठी कुटुंबे या ठिकाणी वास्तव्यास आहेत आणि त्यांनी मराठी भाषा, संस्कृती आणि साहित्याचे जतन करण्यात पुढाकार घेतला आहे. 'मराठी साहित्य अकादमी'च्या निर्मितीमुळे येथील मराठी भाषक सुखावले आहेत.

या अकादमीचे पहिले संचालक म्हणून सूत्रे स्वीकारणारे गणेश बागदरे मूळचे पुण्याचे असले, तरी गेली अनेक वर्षे मध्य प्रदेशात विविध ठिकाणी मराठी भाषेशी निगडित उपक्रमांच्या आयोजनात आघाडीवर आहेत. मध्य प्रदेश सरकारच्या सांस्कृतिक विभागात ते मराठी विभागप्रमुख म्हणून काम करत होते.

■

दै० सकाळ, दि० १२ डिसेंबर २०१०





अनुक्रमणिका

# जगभरातील बोलींच्या संरक्षणासाठी केंब्रिज विद्यापीठाचा प्रकल्प

भारतात तसेच जगात विविध ठिकाणी अस्तंगत होत चाललेल्या बोलीभाषांचे रक्षण व्हावे यासाठी केंब्रिज विद्यापीठाने एक महत्त्वपूर्ण प्रकल्प हाती घेतला आहे. लोकांना या बोलीभाषा कळाव्यात, म्हणून विद्यापीठातील संशोधकांनी खास वेबसाइटवर आता लोकांना त्या भाषासंबंधात मुक्त प्रवेश दिला आहे.

www.oralliterature.org अशी ही वेबाइट असून यात केरळमधील पल्लकड जिल्ह्यात कुरुंबर समाजाची बोली तसेच स्वतंत्र अशी मुदुगार संस्कृतीची माहिती, कागदपत्रे आदी बाबींचा समावेश या वेबसाइटवर करण्यात आला आहे. याशिवाय ध्वनिमुद्रणाचाही समावेश करण्यात आला आहे. बुंदी जिल्ह्यामधील थिकराडा गावातील माळी समाजातील लोकांची जीवनशैली, संस्कृती कळावी असाही एक प्रकल्प यात समाविष्ट आहे. तसेच राजस्थानातील हडोतीमधील तेजाजी परंपरा, रितीरिवाज याची माहितीही असलेले ध्वनिमुद्रण यात आहे. हे सारे ध्वनिमुद्रण हिंदी व इंग्रजीत भाषांतरित करण्यात आले आहे. जगातील ३,५२४ बोलींच्या ध्वनिमुद्रण असलेल्या फाइल्स या प्रकल्पाद्वारे साइटवर उपलब्ध करण्यात आल्या आहेत.

■

दै० लोकसत्ता, दि० १३ डिसेंबर २०१०

### कवितेचे करतेपण

कवितेच्या करतेपणाबद्दल आपल्याला तीन प्रश्न उपस्थित करता येतील. एक म्हणजे : कविता आपल्या श्रोत्यावर-वाचकावर आणि श्रोत्यासाठी-वाचकासाठी काय कार्य करते? दुसरा प्रश्न : कविता आपल्या निर्मात्यावर आणि निर्मात्यासाठी काय कार्य करते? तिसरा प्रश्न : काव्य आपल्या श्रोते-वाचक आणि निर्माते-कवी मिळून बनलेल्या समाजावर आणि समाजासाठी काय कार्य करते? हे तीनही प्रश्न (अर्थातच!) वादग्रस्त आहेत. त्या सर्वांच्या संभाव्य उत्तरांचा शोध आपण घेतला तर कवितेच्या कर्तृत्वाच्या, करामतीचा म्हणा पाहिजे तर थोडा अंदाज आपल्याला यावा.

- डॉ० अशोक रा० केळकर, 'रुजुवात' पृ० ४३-४४

मध्य प्रदेशात 'मराठी साहित्य अकादमी' /...७३

# मराठी अभ्यास परिषद पत्रिका : भाषा आणि जीवन (वर्ष २८) २०१० : लेखनसूची

नीलिमा गुंडी

(सूचना : नोंदीतील पहिला आकडा अंक क्रमांक व दुसरा आकडा पृष्ठक्रमांक दर्शवितो.)

## सदरे

**शंका ...**



**...आणि समाधान**



**पानपूरके**



**भाषावार्ता**



**परिषद वार्ता**



**कविता**



**लेख**

(टीप : नोंदींचे सदरांतर्गत वर्गीकरण स्वतंत्ररीत्या दिले असल्यामुळे येथे सदरांचा उल्लेख केलेला नाही.)

## लेखक

देवनागरी लिपी व वर्णमाला (भाग २) / २.४७
...... / सांस्कृतिक धोरणाच्या मसुद्यातील भाषा आणि साहित्य / २.५७

**मुखपृष्ठ : चित्र व मांडणी**

- पुष्कर सप्रे १
- रविमुकुल २, ३, ४

**लेखकपरिचय**

- १. ८० व आवरणपृष्ठ ३
- २. ८० व आवरणपृष्ठ ३
- ३. ८० व आवरणपृष्ठ ३
- ४. आवरणपृष्ठ ३

■

## शैलीचे दुहेरी स्वरूप

शैलीचा प्रादुर्भाव होण्याचे व्यक्तिनिर्मित, व्यक्तिनिर्वाचित, आणि समाजनिर्वाचित असे जे तीन प्रकार सांगितले, त्यांपैकी दुसरा प्रकारच भाषेच्या बाबतीत सामान्यत: दिसून येतो. एकापेक्षा अधिक सरणी भाषा उपलब्ध करते. उदाहरणार्थ 'माझा भाऊ हल्ली नाशकालाच असतो' आणि 'आमच्या बंधूंचे वास्तव्य सांप्रत नाशिक येथेच असते' अशा अनुक्रमे साहजिक आणि प्रौढ सरणी मराठीच्या प्रमाणबोलीत उपलब्ध आहेत. वधूपित्याशी बोलायला किंवा कुणाची थट्टा करायला ही प्रौढ सरणी उपयोगी पडते. क्वचित एखाद्या व्यक्तीची ती स्थायी सरणी ठरेल आणि इतरांना ते अती औपचारिक वागणुकीचा किंवा अहंमन्य व्यक्तिमत्त्वाचा आविष्कार वाटेल... भाषागत शैलीचा हा सोपा प्रकार. त्याहून सोपा प्रकार म्हणजे भाषाच बदलणे, निदान बोली बदलणे. मनची गोष्ट बोलायला गावाकडच्या बोलीचा आश्रय घेणे किंवा ठासून सांगण्यासाठी इंग्लिशचा आश्रय घेणे हा प्रकार मराठी भाषिकांमध्ये आढळतो. परंतु भाषा जे पर्याय उपलब्ध करते ते नेहमीच अशा जवळजवळ रेडीमेड शैलींच्या स्वरूपाचे नसतात. त्याऐवजी पर्यायांच्या फुटकळ जोड्या किंवा लहान पुंज भाषेत नेहमी हजर असतात. त्यांपैकी काही निर्हेतुक असतात. उदा०, 'चावी' आणि 'किल्ली', 'कर्मणूक' आणि 'करमणूक', 'बस' आणि 'बैस', 'तू आंबा खाल्ला' आणि 'तू आंबा खाल्लास', 'जात असे' आणि 'जाई', 'ऐशी' आणि 'ऐंशी' (सानुनासिक ऐ). बोलणारा किंवा लिहिणारा कोणता पर्याय निवडतो ह्यावरून ग्रहणकर्ता काही अनुमाने कदाचित् काढीलही - उदाहरणार्थ, बोलणारा परगावचा दिसतो, वयस्क असावा, इत्यादी... पण ही अनुमाने शैलीची प्रतीती ह्या स्वरूपाची नाहीत...मात्र त्यांच्यापैकी काही पर्याय-पुंज सहेतुक निवडीला अवसर देतात - उदा०, 'मला ताप आला' आणि 'ताप मला आला' (आणि लाड मात्र तुझे झाले); 'जाणार आहे' आणि 'जाईल'; 'साडेतीनशे' आणि 'तीनशे पन्नास'; 'तू', 'तुम्ही', आणि 'आपण'; 'लहान', 'बारका' आणि 'छोटा'; 'जायला हवे', 'गेले पाहिजे', 'जाणे जरूर आहे', आणि 'जाणे आवश्यक आहे', 'आई', 'माता', आणि 'जननी'. अशा पुंजांतून जी निवड होईल तिच्यावरून ग्रहणकर्त्याला प्रेषकाचा हेतू स्पष्ट होतो. हा हेतू त्या मजकुराच्या आशयाच्या बाजूला जमा होतो हे खरे, पण त्याचबरोबर एका सलग वाक्यबंधनातून असे जे सहेतुक निवडीचे कण येतील त्यांच्यामधून एक शैलीही आकार घेते हेही तितकेच खरे. अभिव्यक्ती ही नुसता आशयाचा आविष्कार करीत नाही, तर आशयात भर घालते. भाषागत शैलींचे स्वरूप असे दुहेरी आहे.

- डॉ० अशोक रा० केळकर, 'रुजुवात' पृ० २७, २८





अनुक्रमणिका

## लेखक-परिचय

- **आचार्य,** (प्रा०) माधव नारायण : एम०ए०, मराठीचे निवृत्त प्राध्यापक. 'अनुषंग' (१९८१), 'मराठी व्याकरण विवेक' (१९९०, २००१), (महाराष्ट्र शासनाचे पारितोषिक), 'ज्ञानमयूरांची कविता' (१९९३), 'आर्याभारत : नवदर्शन' (१९९७), 'पञ्चपदवी ज्ञानदेवी' (२००३), 'ध्वनितांचे केणें' (२००८) ही पुस्तके प्रकाशित. 'मोरोपंतांची सतीगीते' (१९८५, १९९४), 'मोरोपंत विरचित संशयरत्नावली (१९८५), 'मोरोपंतकृत श्लोककेकावली' (१९९४) या पुस्तकांचे संपादक. पैकी शेवटच्या पुस्तकास महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक सभेचे पारितोषिक. 'पञ्चपदवी ज्ञानदेवी' या ग्रंथाला महाराष्ट्र शासन पुरस्कार व संत साहित्य पुरस्कार. 'ध्वनितांचे केणें' या ग्रंथाला मराठी अभ्यास परिषदेचा पुरस्कार.
- **कोल्हटकर,** अरविंद : पुणे विद्यापीठातून गणित या विषयात एम्०ए० पदवी (१९६४). रशियन भाषेचे प्रमाणपत्र व पदविका प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण (१९६५). केंद्रीय लोकसेवा आयोगाची परीक्षा उत्तीर्ण (१९६५). आयकर विभागातून आयुक्त-पदावरून स्वेच्छानिवृत्ती. बॉम्बे स्टॉक एक्स्चेंजचे चिटणीस म्हणून काही काळ काम. आता टोरांटो (कॅनडा)मध्ये स्थायिक. भारतीय भाषा व संस्कृती या विषयांवर विविध संकेतस्थळांवर प्रसंगोपात्त लेखन. kolhatkar.org हे स्वत:चे संकेतस्थळ.
- **गुंडी,** (डॉ०) नीलिमा - स०प० कनिष्ठ महाविद्यालयाच्या उपप्राचार्य पदावरून निवृत्त. कविता, ललित व वैचारिक लेख, समीक्षा, संपादन या प्रकारांतील बारा पुस्तके प्रकाशित. लेखनाबद्दल दोन राज्यपुरस्कार व सहा इतर पुरस्कार 'लाटांचे मनोगत' हे स्त्रीकाव्याचा चिकित्सक अभ्यास करणारे पुस्तक. 'कविता विसाव्या शतकाची' व 'भारतीय भाषांतील स्त्रीसाहित्याचा मागोवा (खंड १ व २)' यांच्या संपादनात सहभाग. राज्यस्तरीय, राष्ट्रीय चर्चासत्रांमधून निबंध सादर. सुमारे पाचशे पुस्तकांचे परीक्षण-लेखन.
- **जोगळेकर,** हेमंत गोविंद : मुंबई आयआयटीमधून रासायनिक अभियांत्रिकीमध्ये पदवी. राष्ट्रीय रासायनिक प्रयोगशाळा, पुणे येथून वरिष्ठ शास्त्रज्ञ म्हणून निवृत्त. 'होड्या' (१९८५), 'माझा(पण) बेहद्द नाममात्र घोडा' (विडंबन कविता), 'मनातले घर' (१९९५), 'उघडे पुस्तक' (२००७), हे कवितासंग्रह प्रकाशित. केशवसुत व बालकवी पुरस्कार. इंग्रजी, हिंदी, उर्दू, गुजराती, कन्नड, पंजाबी व असमिया इ० भाषांत कवितांची भाषांतरे. 'कविता दशकाची', कविता विसाव्या शतकाची', 'स्वातंत्र्योत्तर मराठी कविता - १९६० ते ८०' व 'अक्षर दिवाळी - १९८०, ८१, ८२, ८३, ८४, ८५' या प्रातिनिधिक संग्रहांत कवितांचा समावेश.
- **ढवळीकर,** (डॉ०) म०के० : पुरातत्त्वशास्त्राचे प्राध्यापक व डेक्कन कॉलेज (पुणे) चे संचालक (निवृत्त), कला व पुरातत्त्वशास्त्र या विषयांवरील सुमारे २५ पुस्तके प्रकाशित.
- **देवळेकर,** सुशान्त : एम०ए० (मराठी), सध्या राज्य मराठी विकास संस्था (मुंबई) येथे कनिष्ठ संशोधन-साहाय्यक ह्या पदावर कार्यरत. २००२-०८ ह्या काळात भारतीय तंत्रज्ञान संस्था (आयआयटी) (मुंबई) येथील भारतीय भाषा केंद्रात भाषातज्ज्ञ म्हणून सेवेत. मराठी शब्दबंध हा शब्दार्थसंबंध दाखवणारा कोश, मराठी शब्दरूपांचे विश्लेषण करणारी रूपविश्लेषक ही संगणक प्रणाली विकसित करण्यात सहभाग. संगणकावर युनिकोड वापरून मराठीत काम कसे करता येईल हे समजावून देणाऱ्या कार्यशाळांत मार्गदर्शन.

- **देशपांडे,** (डॉ०) ब्रह्मानंद : महामहोपाध्याय, विद्याभूषण, प्राचीन मराठी वाङ्मयाचे व्यासंगी संशोधक. 'देवगिरीचे यादव', 'शोधमुद्रा' इ० पुस्तके प्रकाशित

- **परांजपे,** (प्रा०) प्र०ना० : एम०ए०,पी०जी०डी०टी०इ०,एम०लिट० रामनारायण रुइया महाविद्यालय, मुंबई येथे इंग्रजीचे १५ वर्षे आणि पुणे विद्यापीठात वृत्तपत्र-विद्येचे २० वर्षे अध्यापन. एक कथासंग्रह, तीन भाषांतरे, पाच संपादने, पाच सहसंपादने व एक सहलेखन अशी १५ पुस्तके प्रकाशित. याव्यतिरिक्त दहा पुस्तकांत लेख समाविष्ट. संगीत नाटक स्पर्धेत लेखनाबद्दल महाराष्ट्र शासनाचे प्रथम पारितोषिक.

- **पाटकर,** रमेशचंद्र : विल्सन महाविद्यालय, मुंबई येथून मराठी-विभाग प्रमुख म्हणून निवृत्त. 'आत्मचरित्र : एक साहित्य प्रकार' या विषयावर पीएच०डी०. 'कलेचा इतिहास : भारतीय पाश्चात्य', हे पुस्तक महाराष्ट्र राज्य कला संचालनालयाने प्रकाशित केले. माधव सातवळेकरांच्या चित्रसंग्रहात सातवळेकरांची दीर्घ मुलाखत समाविष्ट. प्रा० बाबुराव सडवलेकरांच्या लेखसंग्रहाचे ('महाराष्ट्रातील कलावंत : आदरणीय व संस्मरणीय') संपादन. 'शहीद भगतसिंग : आठवणी, विवेचन आणि विचार', 'मराठी नियतकालिकांतील दृश्य विचार' ही अन्य पुस्तके. कथा, कविता, साहित्यसमीक्षा यांचे लेखन.

- **बागुल,** (डॉ०) फुला मोतीराम : बी०एस्सी०, बी०ए०, एम०ए०, बी०एड०, सेट उत्तीर्ण, पीएच०डी० (विषय - मराठी, विज्ञान साहित्यात सुबोध जावडेकरांचे वाङ्मयीन योगदान.) तीन कवितासंग्रह, एक वैचारिक ग्रंथ, दोन इतर व एक संपादित अशी एकूण सात पुस्तके प्रकाशित. 'गुर्जर बोली' या विषयावरील संशोधनासाठी विद्यापीठ अनुदान आयोगाकडून प्रकल्प अनुदान. एस०पी०डी०एम० महाविद्यालय, शिरपूर (जि० धुळे) येथे मराठीचे साहाय्यक प्राध्यापक.

- **मेहता,** (डॉ०) कलिका : एम०ए० (भाषाविज्ञान), एम०ए० (मराठी) मुंबई विद्यापीठ, पीएच०डी० (भाषाविज्ञान), डेक्कन कॉलेज, पुणे. भारतीय भाषा संस्थान (सेंट्रल इन्स्टिट्यूट ऑफ इंडियन लँग्वेजिज), म्हैसूर ह्यांच्या पुणे येथील पश्चिम विभागीय भाषा केंद्रात १९८२पासून अमराठी विद्यार्थ्यांसाठी मराठीचे अध्यापन. सध्या त्याच केंद्राच्या प्राचार्य. अनेक प्रकारच्या शैक्षणिक साहित्याची निर्मिती.

- **मोहनी,** दिवाकर : मुद्रणतज्ज्ञ, लिपीतज्ज्ञ. विवेकवादाला वाहिलेल्या 'आजचा सुधारक' ह्या नियतकालिकाच्या संपादक-मंडळाचे सदस्य.

- **राईलकर,** (प्रा०) मनोहर : एम०एससी० (सांख्यिकी), मुंबई, एम०एससी० (गणित), पुणे, सर परशुरामभाऊ महाविद्यालय, पुणे येथे गणिताचे प्राध्यापक व गणित विभागप्रमुख असे एकूण ३४ वर्षांचे अध्यापनकार्य, नंतर निवृत्त. गणित विषयावरील २३ पुस्तके, तीन कादंबऱ्या, सात विज्ञानकथा व 'भाषा व जीवन'मध्ये अनेक वेळा लेखन प्रसिद्ध.

- **साळुंके,** (डॉ०) प्रकाश श्रीराम : एम०ए०, पीएच०डी०, मराठी विभाग प्रमुख, कला आणि वाणिज्य महाविद्यालय, अक्कलकुवा (जि० नंदुरबार)





अनुक्रमणिका

